


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








सौंदर्याचा
साक्षात्कार
घडविणारें शक्ति मिल्सचें
आकर्षक नायलॉन आणि रेयॉन
कापड, क्रेपस्, जॉर्जेटस्, साटिनस्,
टाफेटाज् आणि ब्रॉकेडस्...
मन मोहविणारीं त्यांच्यावरचीं
डिझाईन्स आणि डोळे निववणारे
त्यांचे ललितरम्य रंग...
Shakti Silks
शक्ति सिल्क्स पोद्दार प्रॉडक्टस्
श्री शक्ति मिल्स लिमिटेड
पोद्दार चेम्बर्स
पारसी बझार स्ट्रीट मुंबई १
shilpi


अनुक्रमणिका

# दीपावली

साहित्य • कला • संगम

वर्ष १६ वें ऑगस्ट १९६०

श्रे य ना मा व लि

कथा :

• अरविंद गोखले—चतुर्भुज • ग. शं. शिरसाट—जाग
• गोपाळकृष्ण भोबे—वचनपूर्ति (चालू लोककथा) • आनंद वर्टी—ग्रहण

काव्य :

• राजा बढे • इंदिरा

ललित लेख :

• जुन्यांतलें सोनें—लोकमान्यांसाठीं परमेश्वरसुद्धां धाय धाय रडला
• काळ बोलतो आहे—बाळ सामंत • अ. सी. केळुसकर • पु. रा. बेहेरे • व्यं. गो. अंदूरकर • गोविंद तळवलकर • काशिनाथ पोतदार
• कलाकृतींच्या जन्मकथा—भय्यासाहेब ओंकार • संत तुकाराम

प्रवास वर्णन :

• अनंत काणेकर—जोहोर बहारू

सदरें :

• परमेश्वर आणि मी—कै. चिंतामणराव कोल्हटकर • डॉ. श्री. शां. आजगांवकर • ललिता पवार • मं. शि. नायक • नवलकथेहूनहि विलक्षण—कु. रोझ जयवंत कोठारे • दीपमाला—पिनाकी
• पानपूरकें—जालियनवाला बाग • बहीत द्रिकवाला • थ
• महाराष्ट्रीय अंतःकरणापासून सर्व एक आहेत • गाडीस खेंचण्यार बंदिवान • महात्म्यांचें स्वप्न.



क्रांति संस्मरण विशेषांक

संपादक-मुद्रक-प्रकाशक : श्री. दीनानाथ दलाल. दलाल आर्ट स्टुडियो ४०-४२ केनेडी ब्रि मुंबई नं. ४. प्रत्येक प्रतीस किंमत रु. १. अधिक रजिस्टर पोस्ट ५० नये पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥ या अंकांत प्रसिद्ध झालेली मतें चालकांची अधिकृत मतें असतात असें नाहीं. 







अनुक्रमणिका




श्रावण शके १८८२ ऑगस्ट १९६०



# संत शिरोमणि तुकाराम

मराठी वाङ्मयधनाच्या इमारतीचा पाया श्री ज्ञानदेवानीं रचिला. नामदेवानीं त्याचा अधिक विस्तार केला. एकनाथानीं मजबूत असे महिरपी खांब बांधले. आणि तुकोबानीं त्यावर कळस चढवून भागवत धर्माची ही इमारत पूर्ण केली.

महाराष्ट्र-धर्माची जाज्वल्य शिकवण देणाऱ्या सर्व संत मालिकेंत तुकारामाइतका-विद्वानांपासून अज्ञांनापर्यंत-लोकप्रिय संत दुसरा नाहीं; किंबहुना भारतांतील इतर भाषांतील वाङ्मयांत देखील त्याला तोड सांपडणें कठीण. तुकोबांचे अभंग प्रत्येक मराठी माणसाच्या ओठावर सुभाषितांच्या रुपानें खेळत असतात. कुठल्याहि घटनेला उपमा द्यायची झाली, कीं पहिल्या प्रथम तुकारामाच्या अभंगाचांच एखादा चरण आपल्याला सुचतो. गेलीं साडेतीनशें वर्षें परंपरेनें तो चालत आलेला असतो. 'निश्चयाचें बळ तुका म्हणे तेंचि फळ' 'त्रैलोक्य पाळितां उबगला नाहीं। आमुचें त्या काई असे ओझें।' 'तुका म्हणे तया भार घातलीया उपेक्षिना दयासिंधु माझा।' 'महापुरें झाडें जाति। तेथें लव्हाळे राहती।' 'जगाच्या कल्याणा संतांच्या विभूति।' 'आलिया भोगासी असावें सादर। 'तुका म्हणे करूनी दावी। त्याचे पाय माझे जिवीं' 'आधीं होती दासी। पट्टराणी केलें तिसी। तिचें हिंडणें राहिना। मूळ स्वभाव जाईना।' उक्ति म्हणून वापरले जाणारे तुकोबांच्या अभंगांतले असे शेंकडों चरण एकामागून एक डोकीं वर काढून आपलें अस्तित्व जाहीर करूं लागतात. मोजक्याच परंतु अत्यंत अर्थपूर्ण अशा त्या शब्दांत, साऱ्या विश्वांतील अनुभव व्यक्त करण्याची शक्ति आहे. ते शब्द भाविक असले तरी सरळ आणि रोखठोक आहेत. त्या शब्दांत निष्ठा आहे. अभिमान आहे. आत्मानुभव आहे; आळवणी आहे. आणि म्हणूनच 'आम्हां घरीं धन शब्दांचींच रत्नें, शब्दांचींच वस्त्रें यत्न करूं। असें अहंतेनें तुकोबा सांगतात; परंतु ही अहंता फक्त शब्दांची श्रीमंति सांगण्यापुरतीच. एरवीं 'आपुलिया बळें नाहीं मीं बोलत। सखा कृपावंत वाचा त्याची।' अशी नम्रता ठायीं ठायीं पसरलेली आहे. नम्रता अमाप; परंतु लाचारी नव्हे. सौजन्य ओतप्रोत भरलेलें; परंतु ढोंग नव्हे. स्वानुभवांत प्रामाणिकपणाचा कळस झालेला; परंतु निर्लज्जपणा नव्हे. या गुणांमुळेंच कीं काय तुकाराम मराठी माणसाला अधिक आवडतो.

तुकारामाचा जन्मशक आणि मृत्युशक, तसेंच चरित्रांतील कांहीं महत्वाच्या प्रसंगांसंबंधीं विद्वान संशोधकांत एकमत नाहीं. महिपती बावा ताहाराबादकरांनी आपल्या भक्तलीलामृतांत ज्या गोष्टी अतिविस्तारानें सांगितलेल्या आहेत त्यांवर आधुनिक इतिहासकार विशेष विश्वास ठेवायला तयार नाहींत. आश्चर्यचकित करणारी त्याकाळांतली कुठलीहि साक्षात्कारी घटना आधुनिक सत्याच्या कसोटीवर धरली तर ती हास्यास्पद वाटावी यात नवल असें कांहीं नाहीं; परंतु ज्या श्रद्धेनें चालतां बोलतां आपण त्यांची अभंगवाणी उच्चारतों, त्याच श्रद्धेनें त्यांचें चरित्र अवलोकन केल्यास आजच्या कालांत अवास्तव वाटणाऱ्या कांहीं गोष्टींवर आपल्याला विश्वास ठेवलाच पाहिजे. 'तुका म्हणे अवघे फिकें भावावीण' असें खुद्द तुकोबांनींच सांगितलेलें आहे. तुकारामाचा जन्म (संशोधकांच्या मतें) शके १५३० म्हणजे इ. स. १६०८ सालीं झाला. जातीनें (कुणबी, शुद्र, वाणी इत्यादि भेद सांगण्यांपेक्षा) वाण्याचा व्यवसाय करणारा तो मराठा होता, इतकें सांगितलें म्हणजे अधिक खोलांत शिरायला नको. कारण संताजी जगनाडे, कान्होबा, रामेश्वर भट्ट, बहिणाबाई आदि तुकारामाच्या समकालिनांनीं त्यांच्या कुळजातीबद्दल वेगवेगळें सांगितलेलें आहे. सारांश 'तुकाराम वाल्होबा आंबिले' राहणार देहूगांव, यांनीं वडिलांच्या पश्चात् आपल्या खानदानी कुटुंबाचा पिढीजात सावकारीचा धंदा वयाचीं वीस वर्षेंपर्यंत उत्तम प्रकारें चालविला. पहिली बायको रखुमाबाई ही दम्यानें आजारी म्हणून वडिलांनीं आपल्या हयातींत 'गुळवे' आडनांवाच्या धनाढ्य सावकाराच्या मुलीशीं त्याचें दुसरें लग्न करून दिलें होतें. 'घरीं उदंड धनमान्य। शरीरीं

(पान ६ वर चालू)








श्री संत तुकाराम

धन्य धन्य, तुका वाणी ॥ धृ० ॥
अमृतरसाची क्षितिवर साची ।
सिंधुचि ज्याची वाणी ॥ १ ॥
डोलवितोचि जडा अजडाहि ।
प्रभुच्या वेणूवाणी ॥ २ ॥
**मोरास** घनीं, श्रोत्या ज्याचे ।
अभंगीं नाहीं वाणी ॥ ३ ॥

कविवर्य—**मोरोपंत**










( पान ४ वरून चालू )

आरोग्य लोकांत मान।' अशी त्याची स्थिति होती; परंतु ही परिस्थिति फार दिवस टिकली नाहीं हळुहळूं व्यापारांत तोटा येऊं लागला. पुढें दुष्काळ पडला त्यांत सर्वस्व गेलें! तें इतकें, कीं माध्यान्हींची पंचाईत पडूं लागली. 'दुष्काळें आटिलें, द्रव्यें नेला मान। स्त्री एकी अन्न अन्न करितां मेली॥ लज्जा वाटे जीवा, त्रासलों या दुःखें। वेवसाय देखें तुटी येतां॥' असें तुकोबा स्वतः सांगतात. अशा वेळीं आधीं पासूनच, घराण्यांत असलेली धार्मिक विरक्तीची वृत्ति बळावली आणि मन ईश्वर चरणांकडे वळलें. संसाराबद्दल मन इतकें विरागी झाले, कीं व्यापाराच्या चोपड्या, खतेंपत्रें सर्व कांहीं इंद्रायणींत बुडवून टाकून तो ईश्वरोपासना करूं लागला. त्यांतच दुसरी बायको जिजाबाई ही कजाग वृत्तीची असल्यानें तिच्या त्रासामुळें औदासिन्य अधिक वाढलें. आणि मनःशांतिकरितां तो अधिकाधिक ईश्वराचा शोध घेऊं लागला. सारा वेळ पांडुरंग चिंतनांत गांवांतल्या देवळांत काढावा, तिथें होणाऱ्या कीर्तनांत हरिदासांच्या मागें धृपद धरावें व जुन्या साधुसंताचे ग्रंथ वाचून पारायणें करतांना तो तहानभूक विसरला. आणि अशा रीतिनें एक दिवस त्याच्या ज्ञानरवीचा उदय झाला.

गांवाजवळील भंडार पर्वतावर जाऊन त्यानें पुरश्चरणास सुरवात केली. सोयरेधायरे निषेध करूं लागले. तरी त्यानें तिकडे बिलकुल लक्ष दिलें नाहीं. 'वृक्षवल्ली आम्हां सोइरीं वनचरें' अशा वृत्तीनें तो राहूं लागला. 'देह जावो अथवा राहो। पांडुरंगीं दृढ भावो' असा त्याचा निःसीम संकल्प होता. आणि अखेर पंढरीनाथानें 'बाबाजीच्या' रूपानें त्यांना दर्शन देऊन 'रामकृष्ण हरी' या महामंत्राचा उपदेश सांगितला. पुढें तुकाराम एकांतवास सोडून लोकांत राहून उपदेश करूं लागला. त्याच्या भजनी लोक लागूं लागले. त्याचा शिष्यगण वाढूं लागला, तसें त्याला विरोधकहि निर्माण झाले. रामेश्वर भट्ट, मंबाजी बोवा यानीं त्याला अतोनात छळलें. आणि इंद्रायणीच्या डोहांत त्याचे अभंग बुडविले. तेरा दिवस पर्यंत तुकोबानीं अनशन करून विठ्ठलाचा धांवा केला. तेव्हां तेराव्या दिवशीं बुडवलेले अभंग घेऊन साक्षात विठ्ठलानें त्याला दर्शन दिलें. अशा अनेक संकटांतून परमेश्वरानें त्याची पाठराखण केली. अखेर नामदेवानी स्वप्नांत येऊन सांगितल्याप्रमाणें त्यांचा शतकोटी अभंगाचा अपुरा संकल्प पूरा करून ईश्वर कृपेनें तुकोबा सदेह वैकुंठास गेले.

तुकोबा सदेह गेले या बाबतींत मतभेद आहेत; तेरा दिवसांनीं प्रत्यक्ष भगवंतांनी त्यांना बुडवलेले अभंग परत दिले, या बाबतींतहि जाणकार लोक संशयी आहेत. कांहींहि असो, परंतु भक्ति, ज्ञान, वैराग्य आणि नीति या भागवत धर्माच्या चार अंगांचा गुह्यार्थ आपल्या सोप्या, साध्या, रसाळ व प्रेमळ वाणीनें ज्यांनीं मुमुक्षु लोकांना समजाऊन सांगितला. आणि गेलीं साडेतीनशें वर्षे अव्याहत ज्याच्या वाणीचा आपल्यावर विलक्षण पगडा आहे तो महाकवि अवतारी पुरुष होता असें सहज म्हणावेसें वाटतें.

गोपालन्

• • •

## कुऱ्हाडिचा दांडा......




......गोतास• काळ

एक जगड्व्याळ, जीवघेणी समस्या—आणि त्यातल्या ह्या चार ( मंतरलेल्या ) अक्षता—

# चतुर्भुज





**ती** हसतच सुटली.

" मला हसूं येत नाही. तू हसतेस याचंच आश्चर्य वाटतंय. भयसुद्धां—"

" भय कारे बुवा—मी भीति थोडीच दाखवली ? उलट माझं मन उघडं केलं. कुणाजवळ केलं नव्हतं ते...आपल्या मनाचे डाव-पेच कुणी स्त्री अशी सांगेल कां कधी ?—पण तूं बोलणं काढलंस, खनपटीस बसलास—मलाहि माझे बेत तपासून, पक्के करून घ्यायचे होते—"

" मग ऐक माझं ! तुझा बेत पक्का करूं नकोस. माझ्याजवळ बोललीस ते पुष्कळ झालं..."

" म्हणजे काय ? मी लग्नच करूं नये असं तुझं म्हणणं आहे ? "

" तूं लग्न कर, संसार थाट असंच माझं म्हणणं होतं. कदाचित् माझ्यां एकट्याचंच म्हणणं होतं. तुझ्या वडिलांना तुझ्या शिक्षणाबद्दल, समाजकार्याबद्दल भलताच अभिमान; त्यांना स्वतःचा संसार तुच्छ वाटतो—अन् तुझ्या संसाराबद्दल हीच त्यांची दृष्टि. तुझ्या आईनें तूं शाळेत असतांनाच तुझं लग्न ठरवायचा घाट घालून गोंधळ केलान्—नि तेव्हांपासून ती तुझ्या लग्नाबद्दल बोलत नाही. तुझे भाऊ तर काय—"

**अ र विं द गो ख ले**

" पण तू आहेस ना भाऊ ! थोडासा माने-थोडासा मानलेला-"

" म्हणूनच परवापरवापर्यंत मी तुझ्या मागें लकडा लावला होता. शिक्षण पुरे, समाजकार्य पुरे, आतां एखादा कुणी गाठून..."

" परवापरवापर्यंत म्हणजे पाच वर्षांपूर्वी ना ? जेव्हां तूं दिल्लीहून सुट्टीचा आला होतास न् .."

" हो तेव्हाच. जेव्हां तू वेगर्स होममधली नौकरी सोडून पीएच. डी. ला नांव घातलंस..."

" जेव्हां तू दिल्लीहून तुझ्या मित्राला आणलं होतंस माझी ओळख करून द्यायला—काय रे नांव त्याचं ? वर्मा कीं शर्मा ?...झालं का रे त्याचं लग्न ?"

" आतां त्याला दोन मुलं आहेत..."







अनुक्रमणिका



## क्रांतीचें ब्रह्मास्त्र !

मंत्रिलें जयानें क्रांतीचें ब्रह्मास्त्र
सावरीत शस्त्रें जयें शिकविलें शास्त्र
कीं गजेंद्र शुंडेनेच जया उपटावें
अरविंद क्रांतिचे मनामनांत फुलावें
ती ज्योत क्रांतिची तरंगली सिंधूत
अन् किरण शलाका भरे बिंदु बिंदूत
तें अंदमानचें होई पावन क्षेत्र
आशेनें बघती जिकडे भारत नेत्र
इहलोकीं अमृत आणियलें वीरांनीं
किति अमर जहाले पिउनी काळेपाणी

—×—

ओविली ज्योत ज्योतीत जीव जरतारी
पदरास गुंफिली सूडाची चिनगारी
यौवनात फुलत्या गुंफियले ग झेले
कोवळ्या रक्तरंगांत रंगले शेले
ग भारत माते तुझी राखण्या लाज
चढविला तुला हा हौतात्म्यांचा साज
भ्रांतिची उडविता राळ विसरले गेले
स्वातंत्र्यसमर तें अमर जयांनीं केलें

त्रिकाळ काळासवें खेळुनी गुंफिले गोफ तूं काळगुंफेतुनी
झुले अंदमानांतला राजबंदी सुहृद्भाव हिंदोल आंदोलुनी

— राजा बढे

---

" बघ—असं झालंय चारी बाजूंनी...बाकी तसं वाईट नव्हतं त्याचं प्रपोज़ल...शेवटचंच ते प्रपोजल..."

" शेवटचं ? त्यानंतर कुणी मागणी घातली नाही तुला ? "

"नाहीं. तो शर्मा शेवटचा. त्या आधी ऑफिसातला साठे, त्या पूर्वी पाटील. बनारसेची तर स्टँडिंग ऑफर होती कॉलेज पासूनची. झालंच तर बाबांच्या मित्राचा एक डॉक्टर मुलगा...आपल्या पुण्याच्या बंगल्यातल्या बिऱ्हाडकरूचा भाऊ...सगळी जुनी यादी. रेषा [illegible]रलेली, रद्दी झालेली..."

[illegible] झाली म्हणतेस ? झाली असणार—तुलाच चाळीस [illegible]..."

" त्या बनारसेनें माझ्याच एका गुजराती मैत्रिणीशी लग्न केलंन्. गेल्याच वर्षी..."

" तेव्हांपासून तुला लग्न करावंसं वाटूं लागलंय कां काय ? "

" असंच नाहीं रे. वाटूं लागलंय अलीकडेच. उगाचच. इतके दिवस नव्हतं कां ठरवलं, लग्नाच्या भानगडींत पडायचं नाहीं म्हणून ! आतां तसाच निश्चय केलाय—काय वाटेल ते झालं तरी लग्न करायचंय ! खूप झालं शिक्षण, समाजसेवा, स्वातंत्र्य. आतां कायमचं आयुष्य बदलावं. ती एक प्रतिज्ञा, तशी हीहि एक प्रतिज्ञाच..."

"..........."

" का रे—गप्प बसलास ? "

" तूं प्रतिज्ञाच केली म्हणतेस—मग काय बोलूं ? तुझा स्वभाव मी ओळखून आहे. तूं खरंच लग्न करशील—"

" खरंच करणार ? अशक्य वाटतंय तुला ? "

" अवघड वाटतंय—"

" अवघड तर आहेच. माझं तारुण्य ओसरलंय. केसांत पांढऱ्या रेषा पडायला लागल्या. पांचसहा वर्षांत विटाळहि जाईल माझा..."

" काय हें !—"

" फॅक्टस् आर फॅक्टस्. कोवळ्या वयांत लग्न करायचं ते बेसावधपणीं. अन् आतां करायचं ते डोळे उघडून. डाव टाकून—"

" डाव नको खेळूं तूं—कुणी चांगला मिळेल तुला. अविवाहित."

" अविवाहित !—चाळीशी उलटलेला नि लग्न न झालेला ? "

" असतात कीं असे. कांहीं कांहीं कारणांनी राहातात...अविवाहित असतात, विधुरहि असतात...मी बघेन..."

" डोळ्यापुढें दोन तरी नांव आणून पहा पाहूं ! असतात तसे—पण लग्न झालंय एवढ्या एका खुणेवर मी बांधून घेणार नाहीं. तें कांहीं क्वालीफिकेशन नको आहे मला..."

" आतां असलाच कुणीतरी..."

" काय म्हणून—काय म्हणून ? कुणी खुळा पांगळा पत्करूं की काय मी ?—मला सेक्ससाठी सोबती हवाय तसा माझी बौद्धिक कुवत पेलणारा, माझ्या आवडीनिवडीशी तद्रूप होणारा...माझ्या हृदयाशी संवाद करणारा...कारे हसलास ? "

" छे—छे...जरा गंमत वाटली—"

" गंमत नाहीं ह्यांत ! कोवळ्या वयांतल्या पहिल्या प्रेमांत अशा हृदयाच्या सोबतीची साद घातली जाते—पण तेव्हां भरली असते वासना—शरीराचे चोचले. आतां ते वय ओसरलं कीं ओढ असते मुख्यत्वे मनाची. बुद्धीची जोड शोधावी, मनांची क्रीडा करावी..."

" तुझ्या चष्म्यांतून पाहते आहेस तूं...पण ह्यांत ढोंग..."

" फारसं ढोंग नाहीं रे...मला संसार थाटायची, चैन करायची आतुरता तर आहेच. पण लक्ष आहे माझ्या तोलामोलाचा, माझ्या शिक्षणाशी, अनुभवांशी तद्रूप होईल अशा—"

" पण म्हणून भक्ष्य कसलं शोधते आहेस तूं ! विवाहित पुरुषांचं !"

" ओरडतोस केवढ्याने !—तुला सांगितलं ना कीं मला शोभेलसा

अनुक्रमणिका



नवरा हवाय मला. मग तो गरीब, श्रीमंत, विधुर विवाहीत हा विचार नकोय—"

"म्हणूनच मी प्रथम म्हटलं की विधुर बघ, अविवाहित बघ—"

"माझी कुठं ना आहे ?—पण शोधूं कुठे हे पुरुषोत्तम ? जाहीरात देऊं ?—"

"असाच कुणी भेटेल कीं—"

"अंधारांतून किरण दिसेल म्हणून वाट पहाणारी मी नाही. मला पुरुष हवाय, व्यासंगी, बुद्धिमान, समानधर्मी मित्र हवाय... अन् तो निवडावा लागणार मला ह्या भोवतालच्या माझ्या ओळखीच्या लोकांतून !"

"म्हणून कुणा विवाहिताची वाट अडवणं ह्यात धोका नाहीं का ?"

"कसला धोका ?"

"का बरं ? त्याचा संसार, बायको मुलं..."

"पहिल्या लग्नाची ना !—मी काय करूं त्याबद्दल ? मी माझं सुख सोडूं ? माझा संसार आवरून ठेवूं ?—"

"पण नन्दिनी...ह्यांत दुष्टपणा...ऑय ॲम सॉरी...तूं रडतेस ?"

"छे रे...मनांत पीळ भरला कीं डोळ्यांतून पाणी ठिपकतं... दुष्टपणा, व्हीलन, विवाहित स्त्रीचा संसार उघ्दावणारी सुशिक्षित प्रौढा—ही सगळी विशेषणं मला लागतील. मला ठाऊक नाहीं कां, मी एकीचा संसार तोडीन नि उरलेल्यांचे शिव्याशाप खाईन तें ? पण मी तरी काय करूं ?—"

"खरंच...तुला नवरा कुठचा मिळणार ?—"

"वय इतकं वाढल्यावर, मनाची उंची इतकी वाढल्यावर... ही तरुण तरुण मुलं भेटतात पण अगदी अजाण असतात रे. बरोबरीचेच मित्र हवेसे वाटतात. ते येतात, गप्पा मारतात, आपली दुःखं सांगतात, कधीं सिनेमाला नेतात...कांहींची मैत्री हवीहवीशी वाटते. ह्यांतलाच कुणी......पण हें सगळेच विवाहित. संसार थाटून बसलेले..."

"तुझ्याशीं आठ दहा हुषार पुरुषांचा चांगला स्नेह आहे, हें मी पाहतोच आहे. पण तूं अविवाहित नि तें संसारी—ही तऱ्हा माझ्या लक्षांत आली नव्हती—"

"कारण मी एका परीघाबाहेर पडले नव्हते. एक बौद्धिक सहवास देऊं करणारं यंत्र म्हणून वावरत होते. आतां मला माणूस व्हायचंय. स्त्री व्हायचंय. भांड्याला भांडं लागतं संसारांत, तसा माझा धक्का कुणा स्त्रीला आतां लागणार. काय इलाज त्याला ?"

"...सगळं विचित्र आहे...तुझ्यासारख्या स्त्रीने लग्न करायचं ठरवलं कीं असं घडणं अपरिहार्य असतं असं म्हणायला हवं. विवाहेच्छू प्रौढ स्त्रीच्या आयुष्यांतली ही शोकांतिका आहे..."

"शोकांतिका ? कां म्हणतोस असं ? मी लग्नाचे, मंगल प्रसंगाचे विचार करीत असतांना ? मनांत घोळणाऱ्या दोन तीन पुरुषांपैकी कुणाची मूर्ती ठसते, ठळक होत जाते, हें पहात असतांना ? बघ, लवकरच मी एंगेजमेंट जाहीर करीन. कुठें दूर जागीं, पळून जाऊन लग्न करीन. लोक बोटं दाखवतील. दगड मारतील. माझ्या



अनुक्रमणिका



शिक्षणाचे नि शीलाचे वाभाडे काढतील...न्हेरी थ्रीलींग...का रे, जीभ तुटली कां...हांस ना !—माझं अभिनंदन करायची किती आधी संधी देतेय मी तुला..."

वाटलं कोणत्याहि क्षणीं ही हुंदके देऊं लागेल.

● ● ●



आम्हां मित्रांच्या कोंडाळ्यांत जेव्हां जेव्हां लग्नाबद्दल गप्पा निघत (आणि त्या अनेकदां निघत–) तेव्हां तेव्हां मी गप्प राहात असें. इतकी वर्षे होऊन गेली, पण त्या तरुण वयांतल्या चर्चा अजून आठवतात. शाळेच्या शेवटच्या वर्गांत आम्ही पाचसहा सोबती संध्याकाळचे समुद्रावर जात असूं. अभ्यास, मग मॅट्रिक झाल्या-वरचे बेत, त्यातून मोठेपणी काय करायचं ह्याचे संकल्प (अन् प्रतिज्ञाहि), अन् मध्येंच संसार कसा थाटायचा नि लग्न करायचं तर कुठल्या, कसल्या मुलीशी ह्यासंबंधी हितगूज. त्या वयांत (आणि त्या काळांत) आजन्म ब्रह्मचर्य पाळून राष्ट्रसेवा करु पहाणारे दोघे वीर आमच्या दोस्तान्यांत होते. पण उरलेले तीनचार स्वतःच्या लग्ना-बद्दल विलक्षण उघडपणें अन् उत्साहानें बोलत. महाडिक म्हणायचा, त्याचं पाळण्यातच लग्न झालंय, अन् बायकोची वाट पहात तो थांबला आहे. गुजरला खूप हुंडा, भरपूर कपडे, दुकानाला भांडवल (मुख्य म्हणजे लग्नात हत्तीवरून वरात–) देणारी मुलगी हवी होती. तर साठेला गाणारी, गोड आवाजाची कोकीळकंठी पत्नी पाहिजे होती, मग ती काळी व आळशी असली तरी बेहत्तर. वेडेकर व कुळकर्णी जरा चावट होते. ते प्रेमविवाह करणार होते. धनुष्याकृति भुवयावाली, कॅालेजात जाणारी अन् प्रथमदर्शनी (एखाद्या अपघाता-नंतर–) प्रेमांत पडणारी कुणी तरुणी आळवीत ते बसले होते. प्रत्येकाची वेगळी तऱ्हा—पण सगळ्याच जणांना आपल्या विवाहा-बद्दल, भावी पत्नीबद्दल, विलक्षण कुतुहल होतें. लग्न झालेल्या, पण तोंवर बायकोचं दर्शन न घडलेल्या महाडिकला देखील ! कशी असेल, कशी दिसेल, कुठे असेल, कधी भेटेल हें काव्यप्रश्न प्रत्ये-काला अस्वस्थ करीत अन् भारावून टाकीत. विवाह हे एक विचित्र प्रश्नचिन्ह होतं. कोडं होतं. लॅाटरी होती. आणि आमची सगळी बुद्धि आपल्या सहचरीचं चित्र रेखाटण्यांत घोटाळत होती.

आमची म्हटलं—पण खरं म्हणजे मी अशा गप्पांचे वेळीं जीभ तुटल्यासारखा बसून राही. महाडिकचं बोलणं ऐकी, गुजर नि साठेचे बेत ऐकी, वेडेकराचं काव्य ऐकी—अन् दुसरा विषय निघायची वाट पाही. मीहि वाढत्या वयांत होतो. पुढच्या आयुष्याकडे विस्फा-रीत नजरेनें पहात होतो. मला लग्न करायचं होतं. होणाऱ्या पत्नीबद्दल कल्पना कराव्यात, अपेक्षा धराव्या, असं मलाहि वाटणं चूक नव्हतं. तरीपण माझं मन भरारी घेत नव्हतं. गिरक्याहि घेत नव्हतं. पिंज-ऱ्यांत ठेवलेल्या पांखरासारखा मी जागच्या जागीच चुळबुळत होतो. वेडेकरला नवल वाटे, मी कांहींच बोलत नाही, नुसताच लाजतो याची. साठे मला डिवचे. माझ्यासाठी तो कल्पना रंगवू लागे. पण मी तसाच स्तब्ध राही. ह्या सर्वांपेक्षां लग्नाचा विचार मीच जास्त केलेला होता. माझंच चित्र जास्त स्पष्ट होतं. परिस्थिती अशी होती कीं माझंच लग्न सगळ्यांत आधी होणार होतं...पण तरी मी निरुत्साही असे.

कॅालेजच्या जगात मित्र पालटले. जुने चार ठिकाणी पांगले नि लांबून, अनेक ठिकाणाहून नवे आले. गुजरची हत्तीवरून वरात निघाली नाही, पण भरपूर हुंडा घेऊन त्यानें लग्न केलें. वेडेकर कॅालेजात येतांच (दरवर्षी–) प्रेमांत पडूं लागला. (महाडिक काय झालं, देव जाणे) नवे मित्र तर नाना तऱ्हेच्या कल्पना घेऊन आले होते. नुसत्या तोंडच्या वाफेत विरघळणाऱ्या व मनांतच घोटाळणाऱ्या कल्पना नाहीत; तर प्रत्यक्ष अंमलांत येणाऱ्या, यायची पराकाष्ठा करणाऱ्या. ठाकूरनें युक्तीप्रयुक्तीनें कुमारी मुजुमदारशी ओळख काढली, दोस्ती वाढवली अन् एक दिवस लग्न ठरवल्याचे जाहीर करून आम्हाला मेजवानी दिली. चित्राव डीग्री मिळवायच्या आधीच मुली पाहूं लागला. किती अटी, किती परीक्षा...किती तरी वर्षे तो मुली पहातच राहिला...

(पान ४० वर चालू)



## महात्म्याचें स्वप्न

[आपल्या मृत्युपूर्वी बरोबर १५ दिवस अगोदर महात्माजी एका सायंप्रार्थनेंत म्हणाले— ]

राजकारणांतील कांहींहि कळत नसतांना माझ्या तरुण वयांत भारतांतील जातीय ऐक्याचें एक स्वप्न माझ्या हृदयांत ठसलें होतें. माझ्या आयुष्याच्या या संधिकालांत हें स्वप्न खरें झालें तर मी एखाद्या लहान बालकासारखी उंच उडी मारीन. मग १२५ वर्षें जगण्याची माझी आशा आणखी बळावेल. अशा स्वप्नासाठीं आपल्या आयुष्याची आहुति देण्यासाठीं कोण धडपडणार नाहीं ? कारण त्यानंतरच आपल्याला खरेंखुरें स्वराज्य लाभेल. १८९६ सालीं मीं दिल्लीच्या सुप्रसिद्ध लाल किल्ला पाहाण्यासाठीं गेलों तेव्हां त्याच्या प्रवेशद्वारावर अशी अक्षरें कोरलेलीं मी पाहिलीं.

'स्वर्ग जर कोठें असेल तर तो येथें आहे, येथें आहे !' त्या लाल किल्ल्याच्या आंत स्वर्ग होता कीं नाहीं हें मला माहित नाहीं. पण मी जेव्हां मोठा झालो तेव्हां भारताच्या प्रवेशद्वारीं अशा प्रकारची अक्षरें कोरण्याची मनीषा माझ्या मनांत निर्माण झाली. अशा स्वर्गांत मग तें पाकिस्तानांत असो वा भारतांत असो, तेथें भिकारी असणार नाहींत, उच्च-नीच, रंक-राव हा भेदभाव, भुकेले मजूर आणि नशा आणणारीं पेयें असणार नाहींत. या स्वर्गांत स्त्रियांना मान असेल, स्वतःच्या पत्नीखेरीज इतर सर्व स्त्रिया मातै-समान मानल्या जातील; तेथें अस्पृश्यता असणार नाहीं, सर्वजण निढळाच्या घामावर जगणारे श्रमिक असतील—

हें स्वप्न खरें होईपर्यंत वाट पाहाण्याची माझी तयारी आहे.

—महात्मा गांधी (१४-१-४८)





# जोहोरबहारु

*मलायांत ब्रिटिश राजवटींत हिंदी माणसाला तिरस्कारदर्शक अर्थानें क्लिंग म्हणत. युद्धकाळांत जपान्यांनीं ब्रिटिशांना हाकललें. सुभाषबाबूंनीं सिंगापुरांत आझादहिंद राज्य पुकारलें तेव्हां त्यांनीं या 'क्लिंग' शब्दावर बंदीं घातली.'*



## सोनेरी उन्हांत पाचूचीं बेटें

अनंत काणेकर

**८ जून १९५५**

माहीमकडे ज्याप्रमाणें मधल्या खाडींत भर घालून मुंबई बेट मुख्य भू भागाला एका रस्त्यानें जोडलें आहे तसेंच अगदीं तसेंच सिंगापूर मलायाच्या मुख्य प्रदेशांतल्या जोहोरबहारूला एका 'कॉजवे'नें जोडलें आहे. आज सकाळीं जोहोर बहारूला जाऊन थोडासा मलायाचा मुख्य प्रदेश पाह्यचें ठरवलें होतें. सोनाळकरांचा धिप्पाड भय्यासारखा दिसणारा शोफर सज्जनसिंग हा आपण शीख आहोंत म्हणतो पण दाढी किंवा जटा नसल्यामुळें, नुसती भरदार मिशीच असल्यामुळें दिसतो काशीप्रयागकडल्या अगडबंब भय्याप्रमाणें मोठा उमदा माणूस आहे. सुभाषबाबूंच्या आझादहिंद फौजेंत होता. सिंगापूरची आणि मलायाची त्याला चांगलीच माहिती आहे. युद्ध संपल्यानंतर तो सिंगापुरांतच राहिला. त्याला मलायी, तामीळ, हिंदी या सर्व भाषा येतात, युद्धाच्या वेळीं मलायाच्या जंगलांतून आम्हीं खूप फिरलों आहोंत, तुम्हाला हवं तें दाखवतों, तो म्हणाला, जोहोरबहारूंत दोन अडीच तास भटकून दुपारीं एकदीडला सोनाळकरांकडे जेवायला यायचें होतें. तेव्हां तो हवें तें दाखवायला तयार असला तरी आम्हाला हवें तितकें पाह्यला वेळ कुठें होता.

बोटीवर स्नान, प्रातरुपाहार वगैरे आटोपून सोनाळकरांच्या गाडींतून सकाळीं साडे नऊच्या सुमाराला आम्ही बाहेर पडलों. थोड्याच वेळांत कॉजवेकडे येऊन पोहोचलों. सिंगापूर आणि मलाया या दोन्ही प्रदेशांवर ब्रिटिशांचेंच राज्य असलें तरी या दोन्ही वेगळ्या वसाहती असल्यामुळें मुंबई बेटांतून माहीम कॉजवे ओलांडून वांद्याकडे जातांना ज्याप्रमाणें वाटेंत दारूबंदीच्या पोलिसांचें ठाणें आहे तसेंच इथें कॉजवे संपतो तिथें कस्टमचें नाकें आहे. नाकें पार करून पुढें गेलों तों एक भव्य, व्यवस्थित ठेवलेली मशीद दिसली. सिंगापुरांतल्यापेक्षां इथें एकद्रम वेगळें वाटलें तें म्हणजे पहावें तिथें सिंगापुरांतल्यासारखे पिवळे चिनी दिसत नव्हते, तर लुंगीसारखा रंगीबेरंगी सेरॉंग आणि सदऱ्यामध्यें फिरणारे काळे सावळे मलायी दिसत होते. एका चौकापलीकडे एक मोठी थोरली जुनाट पिवळी इमारत दिसली. तो जोहोरबहारू संस्थानाच्या सुलतानाचा राजवाडा असल्याचें कळलें. तांबड्या विटांची एक भव्य इमारत हॉस्पिटलाची होती. कांहीं चहपाण्याचीं दुकानें भारतीय तमीळांचीं दिसलीं; आणि भेंडीबाजारांतल्या मुसल्मानांच्या दुकानांत चहापाणी घेणारे बाहेर फूटपाथवर खुर्च्या टाकून चहापाव वगैरे घेतात तसेहि कांहीं इथे दिसले तेव्हां भारतांतल्याच एखाद्या गांवांत आपण फिरतों आहोंत असें वाटलें.

जोहोरबहारूच्या खाडीच्या काठानें फिरत असतां मलायी कोळ्यांच्या झोपड्या आणि त्यांचीं जाळीं दिसलीं. सभोंवार खुंट पुरून त्यांना लावलेली जाळी मध्यें झोळीसारखी लोंबत होती. जवळच एक लहानसें खोपट होतें. या जाळ्यानें मासे कसे पकडतात याची कांहीं कल्पना येईना.

नंतर एका रबराच्या उंच झाडांची गर्द राई होती. जगांतला बहुतेक रबर मलायांतच होतो. या मळ्यांत काम करणारे बहुतेक स्त्रीपुरुष आपल्या भारतांतले तमीळ आहेत, सज्जनसिंग म्हणाला. कांहीं रबराच्या झाडांमधून एक काळीकुट्ट तमीळ म्हातारी हातांत एक बालदी घेऊन येत असलेली आम्हाला दिसली. स्वच्छ पांढऱ्या दुधानें बालदी भरली आहे, असें वाटलें. तो रबराचा चीक होता. प्रत्येक झाडाची गोल साल काढून एक पत्र्याचा तुकडा झाडा[ला] खोचलेला [अ]सतो.

अनुक्रमणिका






त्याच्या टोकाला एक बुडकुलें तारेनें बांधून ठेवलेलें असतें. दिवसभर त्या बुडकुल्यांत रबराचा चीक ठिबकतो. बुडकुलें भरलें कीं बालदींत ओतावयाचें आणि पुन्हां लावून ठेवावयाचें. हेंच काम करीत ती मद्रासी म्हातारी फिरत होती. सज्जनसिंग तिच्याशीं तमीळमध्यें बोलत होता. बालदीचें वजन करून त्याप्रमाणें आपणाला मजुरी देतात, ती म्हातारी त्याला म्हणाली. यंदा पाऊस कमी आहे तेव्हां रबरहि कमी मिळणार, ती सांगत होती. तिच्या बालदींत बोट बुडवून मी पाहिलें. अगदीं दुधांत बोट घातल्यासारखें वाटलें. रबराचा चीक फारसा जीड नव्हता. मात्र झाडावर सुकलेला चीक ओढून पाहिला तेव्हां चांगली लांब तार येऊं लागली.'

जोहोरबाहरूंतल्या सचिवालयाची प्रशस्त इमारत मोंगल पद्धतीनें बांधलेली वाटली. दिवाण-इ-आम, दिवाण-इ-खाससारखे मोठमोठे दिवाणखाने, आणि एके ठिकाणीं तर तख्तहि दिसलें. काल रात्रीं उंगकू अझीझ यांच्या घरीं जेवणाच्या वेळीं भेटलेले चुणचुणीत मलायी गृहस्थ बॅरिस्टर अब्दुल्ला सचिवालयांत अंडर सेक्रेटरी असल्याचें कळलेंच होतें. त्यांच्या खोलीवर गेलों तेव्हां ते सिगारेट ओढीत काम पहात असलेले दिसले. ' सिंगापूर हें बेट आहे, जोहोरबहारू



म्हणजे मलाया, ' ते म्हणाले, ' बरं झालं तुम्ही पाहयला आलांत ते ' त्यांनी कॉफी मागवली आणि कांहीं वेळानें आमच्याबरोबर फिरून सचिवालय दाखवलें. जोहोरबारू, केलानान वगैरे आठ नऊ संस्थानें मिळून मलाया होतो. ब्रिटिशांचें मलायावर अधिराज्य असलें तरी या प्रत्येक संस्थानाचा सुलतान आहेच. जोहोरबहारूचे सुलतान सध्यां युरोपांत आहेत. सचिवालयांतल्या एका मोठ्या खोलीच्या दारावर ' मेंत्री बेसार '

अशी इंग्रजी पाटी होती. हें काय म्हणून अब्दुल्लांना आम्ही विचारलें तेव्हां त्या शब्दाचा अर्थ ' मुख्य मंत्री ' असा असल्याचें त्यांनीं सांगितलें. सचिवालयाच्या गच्चीवरून शहराचें चांगलें दृश्य दिसतें. म्हणून लिफ्टमधून त्यांनीं आम्हाला वर नेलें. लिफ्ट चालवणारा नोकर अली मद्रासकडला भारतीय मुसलमान होता. आम्हांला पाहून तो खूष झाला.

पांढरा सूट आणि काळी मलायी टोपी घातलेले छोटेसे, सुटसुटीत बॅ. अब्दुल्ला आपण चाळीस वर्षांचे आहोंत असें म्हणाले तेव्हां आम्हाला खरेंच वाटेना. मलायी लोकांचें वय त्यांच्या चेहेऱ्यावरून किंवा अंगलटीवरून सांगणें फार कठीण आहे. ते फार तरुण दिसतात. अब्दुल्ला फार उमद्या स्वभावाचे आणि थट्टेखोर आहेत. पण माणूस जितका रसिक तितकाच विद्वान् असल्याचें तास दीड तासाच्या सहवासांतच आमच्या लक्षांत आलें. सचिवालयांतलें ग्रंथसंग्रहालय दाखवतांना बाली बेटांत अनेक वर्षें राहिलेल्या एका मेक्सिकन चित्रकारानें बाली बेटावर लिहिलेलें पुस्तक त्यांनी आमच्या हातीं दिलें, आणि एकदोन मिनिटांत त्यापुस्तकाची मार्मिक चर्चा केली. आपल्याकडे ज्याप्रमाणें मोल्सवर्थ, कॅन्डी इत्यादि ब्रिटिश सनदी नोकरांनीं मराठी भाषेचे कोश तयार केले त्याप्रमाणेंच मलायांतले एक ब्रिटिश अधिकारी आर. एस. विल्किन्सन यानीं तयार केलेला मलायी-इंग्रजी शब्दकोश त्यांनीं आम्हाला दाखवला.

' आतां आमच्या घरीं चला, ' ते म्हणाले,

' तुम्ही आत्तांच ऑफिसांत आला असाल, मी म्हणालों, ' नि पुन्हां—'

' ऑफिस आहेच ' ते उद्गारले, ' तुम्ही मंडळी मलायांत काय पुन्हां पुन्हां येणार ? आमच्या घरीं आलेंच पाहिजे तुम्ही—तास अर्ध्या तासांत ऑफिसांत परत येईन. '

सचिवालयाच्या आवारांतली आपली मोटर त्यांनीं बाहेर काढली, नि त्यांच्या मागून आमचीं मोटर घ्यायला त्यांनीं सज्जनसिंगाला सांगितलें.—

आमचें आपलें जुनें घर आहे असें अब्दुल्ला म्हणाले होते, पण त्यांचा बंगला, त्यांतलें फर्निचर बाहेरचीं फुलझाडें,







आंतल्या फुलदाण्या, खिडक्यांचे पडदे त्यांच्या रसिकतेची चांगलीच साक्ष देत होते. त्यांची व्यवस्थितपणें लावलेलीं पुस्तकांची कपाटें पहातांना त्यांच्याबद्दल मला वाटत असलेला आदर क्षणोंक्षणीं वाढत होता. एका कपाटांत टी. एस्. इलियटचीं नाटकें, त्याच्या टीका-लेकांचीं पुस्तकें, टॉल्स्टॉय, टॉमस मॅन, जेम्स जॉइस यांच्या कादंबऱ्या, अरबांचा इतिहास नेहरूंच्या भाषणांचा ग्रंथ, पट्टाभिसीताराम-य्यांनी लिहिलेला काँग्रेसचा इतिहास मला दिसला. एक दोन पुस्तकें बाहेर काढून मी सहज चाळून पाहिलीं. त्यांत सुंदर, सुवाच्य अक्षरांत टिप्पणें केलेलीं मी पाहिलीं. ती पुस्तकें केवळ शोभेकरतां ठेवलेलीं खास नव्हतीं. 'लंडनमध्यें मी शिकत होतों इतक्यांत युद्ध सुरू झालं' अब्दुल्ला म्हणाले, 'तेव्हां रॉयल एअर फोर्सच्या वैमानिकांसाठीं मलायी भाषेवर व्याख्यानं देण्याचं काम मला मिळालं. त्याआधीं पैसे संपल्यामुळें कित्येक महिने नुसतं पावलोणी नि पापी यांच्यावर रहाण्याची माझ्यावर पाळी आली होती हो ! हें काम मिळालं नि चंगळ झाली. वर्षाला एक हजार पौंड पगार ते मला देत होते. मग काय पुस्तकं विकत घेत होतों, नाटकं पहात होतों, जलशांना जात होतों–( बायकोकडे डोळे मिचकावून पहात )–इंग्लिश पोरींना घेऊन भटकत होतों !'

अब्दुल्लांची तरुण पत्नी झहीदा तिथं होतीच. ती खिलाडुपणें हंसत म्हणाली, 'बरं, बरं–परत जा इंग्लंडला !'

ते मलायाला परत आले तेव्हां जपानचा पराभव करून ब्रिटिश मलायांत परत आले होते. एक हजार जपानी कैद्यांच्या एका कॅम्पच्या मुख्य अधिकाऱ्याचें काम त्यांनी अब्दुल्लांना दिलें होतें. कैदेंतल्या कांहीं जपानी लष्करी अधिकाऱ्यांची त्यांच्याशीं चांगली मैत्री झाली होती. एकानें त्यांना आपली 'सामुराई' तलवार बक्षीस दिली होती, तर दुसऱ्यानें 'हाराकिरी' करायचा खंजीर दिला होता. या वस्तू एका काचेच्या कपाटांत व्यवस्थितपणें मांडून ठेवलेल्या होत्या.

आम्ही दिवाणखान्यांत बोलत बसलों होतों, इतक्यांत झहीदाभाईनीं तांबड्या सरबताचीं ग्लासें, आणि एका सुंदर बशींतून द्राक्षें, केळीं वगैरे फळें आमच्या पुढ्यांत आणून ठेवलीं. मलायी केळ्यांचें एक वैशिष्ट्य म्हणजे बाहेरून सालीचा जसा त्यांचा पिवळा रंग होता तसाच पिवळा आंतल्या गाभ्याचाहि होता.

सात वर्षांच्या, पांच वर्षांच्या, तीन वर्षांच्या अशा तिथें खेळत असलेल्या आपल्या छोट्या मुलांची अब्दुल्लांनीं आमच्याशीं ओळख करून दिली. सर्वसामान्यपणें मलायी लोक फारसे उजळ असल्याचें आम्हांला आढळलें नव्हतें. पण अब्दुल्लांच्या पत्नी झहीदाबेगम आणि सुंदर फ्रॉकमधल्या त्यांच्या नीटस चेहेऱ्याच्या मुली चांगल्याच उजळ होत्या. एका मुलीचें नांव आशा. दुसरीचें सुकैना. मी म्हटलें, 'अहो, हिचं नांव आशा नि हिचं सुकन्या असेल !'

'म्हणजे काय ?' अब्दुल्लांनी विचारलें.

त्या संस्कृत शब्दांचा अर्थ मी त्यांना सांगितला.

ते हंसत म्हणाले, 'असेल, बुवा !'

( पान २३ वर चालू )

# जाग !

हळुं हळुं काळोख पसरूं लागला. आणि रस्त्यावरचे दिवे चोरट्या पावलांनी आपलं अस्तित्व प्रगट करूं लागले. मग मूर्च्छितावस्थेंतली तेथली दुनिया जाग घेऊं लागली. फिल्मि गाण्यांचे उत्तान सूर अवकाशांत त्रिकोण साधूं लागले. बनारसी चुना–पानांचा रस उसळ्या मारूं लागला. रंगीत साड्यांची टोकं दाराच्या फटींतून डोकावूं लागलीं. आणि खिडकींतून बाहेर काढलेला गोरा मांसल दंड दणकट बाहूं-मधल्या नसा फुगवूं लागला—

तेथली सृष्टि बेहोष झाली. आणि त्या बेहोषीवर पोसला जाणारा व्यवहार फेर धरूं लागला. पानवाल्याचीं घंटा घणघणूं लागली. रेडिओंतल्या गाण्यांच्या तालावर हॉटेलांचे मालक पुढ्यांतला गल्ला कुरवाळूं लागले. माल पुरवणारी पोरं बिलांचे आंकडे तार स्वरांत देऊं लागलीं आणि उंबरठ्यावर आलेल्या गिऱ्हाईकाला नाजुक हात खोलींत ओढूं लागले. रंगीत ओठांची हालचाल खिशांतल्या पैशांना तुच्छ लेखूं लागली,

शांताची कृश काया दारांतल्या खांबाला टेकून बसली. खोलींतलीं पाण्याची पिंपं भरून ती घामाघूम झाली होती.

अशीच कितीतरी वेळ ती तिथं बसणार होती. स्वैरतेच्या कमानी-खालून दिमाखानं चालणारी तेथली बेहोषी तटस्थपणें पहात ती बाजार संपेपर्यंत तिथं बसणार होती.

समोरचा खेळवाला बरोबर असलेल्या परकरी पोरीला घेऊन पाव-उसळ खात होता. शांतेला वाटलं हा पुरुष उसळीबरोबर येथल्या बाजाराचीहि चटक त्या पोरीला लावतो आहे.

तिरस्कारानं पण असहायपणें शांतानं त्या दृश्यावरील आपली नजर काढून घेतली.

चटावलेल्या, पळवलेल्या, डांबलेल्या अनेक पोरी तिनं पाहिल्या होत्या. तिच्या मनांत आलं, हीच पोरगी एके दिवशीं इथल्या एखाद्या खोलींत येईल. जवानीच्या नशेंत येथल्या उल्लु दुनियेला आपल्या पदराच्या टोंकाला बांधून लोळवील. आणि मग ?

सुकलेली काया निदान चहा–पाव तोंडांत पडावा म्हणून त्याच खोलींत पाणी भरूं लागेल. धुणीं धुवूं लागेल. बिछाने साफ करूं लागेल.

पण छे ! हें तरी कुठं खरं आहे, शांतानं अंदाज घेतला, आपल्याच बरोबर धंदा करणाऱ्या हुसेनबीला, पारम्माला कमाई बंद



—ग. शं. शिरसाट

—हीच पोरगी एके दिवशीं इथल्या एखाद्या खोलींत येईल जवानीच्या नशेंत येथल्या उल्लू दुनियेला पदराच्या टोंकाला बांधून लोळवील. आणि मग ? —

अनुक्रमणिका




झाल्यावर नाहीं का लाथेनं बाहेर काढलं होतं. मालकिणीनं आपल्यावर दया दाखविली म्हणून सगळ्यांच्याच नशिबी का हें सुख येतं !

शांतानं समाधानानं डोळे मिटले.

खालून गटाराचं पाणी वहात होतं आणि सुरकुतलेल्या चेहऱ्याची शांता जीवनाच्या डोहाचा तळ शोधीत होती.

अशाच होत्या त्या रात्री. धुंद, मस्त, पागल. हिंदकळणाऱ्या जवानीशीं लगट करणाऱ्या......

......दणकट खांद्याच्या साटम हवालदारानं तिला म्हटलं, "शांते, मोठी जादुवाली आहेस तूं. तुझ्याकडे आलं कीं कुठं जाऊंच नये असं वाटतं बघ."

शांतानं आपली मूठ त्याच्या दंडावर आपटली. कापसाचा गोळा आपटल्यासारखं त्याला वाटलं. तो शिपाईगडी खुष झाला.

रात्र रंगली.

बाहेरच्या पलंगावर बसलेल्या थुलथुलीत मालकिणीनं कौतुकानं, प्रेमानं शांतेचा गालगुच्चा घेतला......

......"तुम जैसी मेहबान सब जगह नहिं मिलती" एक लखनौवाला पागल. "यहि देखो ना, तुमने दिया हुवा पान मेरे मुँहमें और रंग तुम्हारे होटोंपर."

"अच्छा यह तो बता, तुम्हारा इस्मेशरीफ?"

"मेरे मेहमान, बन्दीको शांता पुकारते हैं" ती म्हणाली.

"खूब. बहोत खूब." तो निहायत खुष झाला.

खिशांतल्या नोटांची किंमत तिच्या डौलदार हालचालीशीं स्पर्धा करूं लागली. बिचाऱ्या नोटांनीं हार खाल्ली.

पलंगावरच्या मालकिणीला अवसान चढलं. आणि त्याबरोबर पानाचा दुसरा विडा तोंडांत शिरला...

"...वाहवा. वाहवा. तुमको तो देखतेहि तबियत खुष हो गयी." एक भय्या.

"वो कैसी?" त्याच्या खांद्यावर हात ठेवीत शांतेनें विचारलें.

तो विनयपूर्ण लाजला.

ती धंदेवाईकपणें हंसली.

त्याला वाटलं खिशांतलीं नाणीं तिच्यावरून ओवाळून टाकावीत......

"ए शांते, दोन पेशल चा सांग नाक्यावर." खोलींतल्या पोरीच्या आवाजासरशीं तिची तंद्रि मोडली. लगबगीनं ती उठली अन् चालूं लागली.

तिच्या चालींत संवयीची सहजता होती. लाचारीचा उसासा होता. आणि कर्तव्याशीं गांठ मारलेली तत्परता होती.

चार आण्यांच्या बक्षिसीसाठीं खरखरीत थोबाडांचे मुके घेणाऱ्या त्या खोलींतल्या पोरींचे हुकूम पाळणं तिला भाग होतं.

तिनंहि रंग उधळले होते पण कांहीं जमा केलं नाहीं. हाडं वर आलेल्या चेहऱ्याला डबींतला रंग उठाव देईना तेव्हां जुनीं गिऱ्हाइकं देखील तोंड फिरवूं लागलीं.

प्रसंग ओळखून शांतेनं मालकिणीचे पाय चेपले. तेव्हां तोंडांतला पिंक पचकन् बाहेर टाकीत तिनं म्हटलं होतं, "ऱ्हा तूं माझ्याकडं. सांभाळीन मी तुला."



'ब्रिटिशाचें एक
बेशरमपणाचें कृत्य'

# जालियनवाला बाग—

हा रानटी आणि भयंकर अत्याचार झाल्याला आज आतां बरींच वर्षे होऊन गेली आहेत तरी अद्यापि त्यासंबंधींची मनाची चीड नाहींशी होऊं शकत नाहीं, त्याबद्दल क्षमा करावी असें मनाला वाटत नाहीं. तरीपण असा हा अत्याचार कां केला असेल याचें मर्म आपणांस समजून घेणें कांहीं कठिण नाहीं. ब्रिटिशांच्या हिंदुस्तानांतील सत्तेचे स्वरुपच असें आहे कीं आपण जणूं एखाद्या ज्वालामुखीच्या तोंडाशीं आहोंत अशी भीति त्यांना वाटत असते. ते राहातातहि हिंदी लोकांच्यापासून दूर. त्यांचा सारा आधार आपलें प्रचंड आणि अत्यंत गुंतागुंतीचें राज्ययंत्र आणि त्याच्या मागची लष्करी शक्ति यावर असतो. पण त्यामुळें त्यांना किती जरी विश्वास वाटत असला तरी अज्ञात अशा कांहीं शक्तीचें भय त्यांच्या मनांत नित्य घर करून बसलेलें असतें. आणि हिंदुस्तान हा देश त्याच्यावर त्यांनी दीडशें वर्षे राज्य केलें असलें तरी त्यांना तो नीट समजलेला नाहीं. त्याचें खरें स्वरूप आणि शक्ति त्यांना अजून अज्ञात आहे. १८५७ च्या बंडाची आठवण त्यांच्या मनांतून बुजलेली नाहीं. आपण जणूं एका अनोळखी आणि वैरी अशा देशांत राहात असून हा देश केव्हां आपल्यावर उलटून आपल्याला कापून काढील याची त्यांना भीति वाटत असते. इंग्रजांची मनोभूमिका असल्यामुळें आपल्या देशांत मोठी चळवळ उभारली जात आहे असें जेव्हां त्यांनीं पाहिलें तेव्हां त्यांचें भय अधिकच वाढलें. अमृतसर येथील १० एप्रिलच्या दिवशीं गोळीबार आणि त्यानंतरचे जे खून झाले, त्याची बातमी लाहोरमधील अधिकाऱ्यांच्या कानीं आली. तेव्हां तर त्यांची पांचावर धारण बसली. १८५७ साल सारखें एक प्रचंड बंड उभें राहिलें आहे आणि इंग्रज लोकांचे जीव धोक्यांत आहेत असें त्यांना वाटलें आणि यामुळें त्यांचें डोकें फिरलें आणि त्यांनीं लोकांच्या मनांत धडकी भरवायची असा निश्चय केला. जालियनवाला बाग या मनोवृत्तीचा परिणाम होय!

एखादा मनुष्य कारण नसतांना भयभीत झाला आणि अशा भयभीत स्थितींत त्यानें कांहीं अयोग्य आचरण केलें तर त्याबद्दल

अनुक्रमणिका

आपण जरी त्याला क्षमा करूं शकलों नाहीं, त्यानें असें कां केलें असावें हें तरी आपणांस समजू शकेल. पण हिंदुस्तानला कशाचा अचंबा वाटला असेल तर आणि अत्यंत राग आला असेल तर हा वेडेपणाचा प्रचार झाल्यावर कित्येक महिन्यांनीं जनरल डायर यानें त्या प्रचारचें जें अत्यंत तिरस्करणीय असें समर्थन केलें त्याचा आणि गोळीबार होऊन गेल्यावर जखमी लोकांची शुश्रूषा करण्याचे बाबतींतहि त्यानें जो रानटीपणानें निष्काळजीपणा केला त्या गोष्टीचा आला. "हें कांहीं माझें काम नव्हतें." असें तो म्हणाला. इंग्लंडमधील कांहीं व्यक्तींनीं आणि ब्रिटिश सरकारनें डायरला उगीच थोडासा दोष दिल्यासारखें केलें. परंतु लॉर्डच्या सभेंत त्याच्यावर स्तुतीचा जो वर्षाव करण्यांत आला त्यावरून त्यासंबंधांत इंग्लंडमधील सत्ताधारी वर्गाची भूमिका काय आहे हें अगदीं उघड झालें. त्यामुळें हिंदुस्थानांत संतापाच्या ज्वाला भडकल्या आणि पंजाबवरील या अत्याचाराबद्दल देशांत फार मोठ्या प्रमाणावर लोकांच्या मनांत अढी बसून गेली.

—जालियनवाला बाग हें हिंदी लोकांचें राष्ट्रीय यात्रेचें ठिकाण झालें आहे. आतां तेथें मोठी छानदार बाग करण्यांत आली असून त्यावेळचें भयंकर दृश्य आतां विशेषसें दिसून येण्याला साधन नाहीं. परंतु त्या संबंधीची स्मृति मात्र ताजीच आहे.

(जवाहरलाल नेहरू : ११ मे १९३३)
जागतिक इतिहासाचें ओझरतें दर्शन.



* * *

---

शांता राह्यली. हुसेनबी सारखं आपल्याला लाथ मारून बाहेर काढलं नाहीं म्हणून परमेश्वराचे तिनं आभार मानले. पाणी भरण्यासाठीं, बिछाने साफ करण्यासाठीं, कमावत्या पोरींचीं धुणीं धुण्यासाठीं आपल्याला ठेवून घेतलं म्हणून तिनं खोलींतल्या तसबिरीसमोर हात जोडले.

आतां तेंच कर्तव्य पार पाडणं तिला भाग होतं. तरच रात्रीं पोटांत अन्नाचा गोळा जाणार होता. झोंपतांना मालकिणीच्या कपाळावरून हात फिरवल्यावर पानतंबाखूसाठीं हातावर एक आणा पडणार होता.

शांता नाक्यावरच्या हॉटेलाजवळ गेली. लागूनच असलेल्या पानपट्टीच्या दुकानावर रंगेल गिऱ्हाईकांची झुंबड उडाली होती.

शांताला वाटलं, त्या घोळक्यांत उभा असलेल्या गोऱ्यापान तरुणाकडे क्षणभर पहात राहावं.

एका गूढ संवदनेनं तिचा चेहरा उजळला. तरुणाच्या अधीऱ्या मनांतलं गडद निळ्या रंगाचं उकळतं प्रेम ती प्याली होती.

ती परत खांबाला टेकून बसली. एका गोड आठवणीनं तिचं मन व्यापून टाकलं.

प्रभाकर पानसरे ! कॉलेजांतला विद्यार्थी. नांवासारखंच त्याचं रूप होतं. आणि डोळ्यांत सहानुभूति निथळते आहे किं काय असं वाटायचं. एकटाच रहात होता तो. आठवड्यांतून त्याची एक फेरी असायची. झोंपायलाच यायचा. तिची आठवण ताजी होऊं लागली...

"शांते, कोणी आणलं तुला इथं ?"

"कां ? माझी बारीक माहिती तुला कशाला ?"

"सहज."

ती हंसायची. तो चुळबुळ करायचा.

"शांते, माझ्याबरोबर तुला येतां येईल का ?"

"नाहीं."

"कां ?"

"तुला पांचशे रुपये मोजावे लागतील माझ्या आईजवळ."

"कुठली आई तुझी ?"

"बाहेर बसली आहे ती."

"ती आई तुझी ?"

"अंहं, आम्ही म्हणतों तिला आई."

"कां ?"

"आम्हाला शिकवलं आहे तसं."

"पांचशे रुपये कां द्यावे लागतील ?"

"कारण तिनं म्हामूदला तेवढे देऊन मला घेतलंय."

"कोण म्हामूद ?"

"आतां येईल थोड्यावेळानं फटफटीवरून. इथला दादा आहे तो."

"मग पळून जाऊं या. येशील ?"

"आं ? लग्न लावायचा विचार आहे कीं काय माझ्याशीं ?"

ती खो खो हंसायची.

तो तिचा हात दाबायचा.

त्याच्या कपाळावरच्या बटा मागें सारीत ती म्हणायची "माझ्या राजा, कां उगाच डोकं शिणवतोस तुझं नि माझं. पड गुपचुप. चा. सांगून येते मी तुझ्यासाठी." आणि त्याला अलगद लोटून ती बाहेर यायची......

शांतेचं मन त्या आठवणीसरशीं भिजून गेलं. पापण्या ओलावल्या. डोकं सुन्न झालं.

तितक्यांत एक तगडा टॅक्सीवाला सर्रकन् तिच्या पुढ्यांतून टॅक्स घेऊन गेला. आणि तिच्या मनांतल्या अडगळींतला एक कोळी जागा झाला.

बाहेर टॅक्सी उभी करून पांडु ड्रायव्हर खोलींत शिरायचा तेव्हां त्याचे डोळे तरारलेले असायचे. अर्धातरी असल्यासारखा तो चालायचा. आणि त्याच्या तोंडावाटे शब्द बाहेर पडत तेव्हां ते कोलमडत येताहेत कीं काय असं वाटायचं. बाजारांतल्या बाईबरोबर वागतांना सुद्धा कांहीं शिष्टाचार पाळावे लागतात हें त्याला मान्य नव्हतं. शांतेनं त्याचं मनापासून स्वागत कधींच केलं नाहीं.

खोलींत शिरतांच तिच्या हाताला धरून फरफटत तो आंत नेत असे. एके दिवशीं ती चिडलीच. फणकाऱ्यानं हात सोडवूं लागली.





" अग कशाला नखरा करत्येस. पैशे मोजणार हाय मी. " त्यानं पुरुषाच्या मिजाशींत सांगितलं.

" घेऊन जा तुझे पैसे. " तीहि हट्टाला पेटली.

त्यानं आपली पकड घट्ट केली.

" अर बायको समजलास कीं काय मला तूं ? "

त्या सरळसोट माणसानं अलगदपणें तिचं काळीज तव्यावर टाकलं होतं. पण सारवासारव कारणं भाग होतं. ती हंसली. आडमुठं गिऱ्हाईक भेटल्यावर वेळ मारून नेण्यासाठीं दुकानदार वाणी हंसतो तसं......

" बायको व्हायला नशीब लागतं ! " शांता मनाशीं पुटपुटली. " खरं आहे का त्याचं म्हणणं ? "

बायको होण्यांतलं सुख ! आपल्या पुरुषाच्या खांद्यावर विश्वासानं डोकं विसावण्यांतलं सुख !

शांतेचा जीव व्याकूळ झाला. तिला वाटलं, साऱ्या विळविळत्या सर्पांनीं आपल्या अंगाचे लचके तोडून हाडं कुजवून टाकली आहेत.

" मग पळून जाऊं या. येशील ? "

खुळा होता का तो ? त्याच्या भावनेची कदरच केली नाहीं का आपण ? कीं पुढचीं संकटं त्याच्यावर नकोत म्हणून त्याला आपण गप्प केलं. कीं इथल्या पैशाचा मोह सोडवेना. कीं संवयीनं इथंच रहावंसं वाटूं लागलं.

" बायको हुयाला नशीब लागतं. हाय का तुझ्याकडं त्ये ? "

" मग पळून जाऊं या. येशील ? "

शांता गुदमरुन गेली.

आदर आणि उपहास ह्यांच्या झटापटींत तिचं मन चेंगरून गेलं. समोरचं तिला दिसेना. आणि तेवढ्यांत एक चमत्कारिक विचार तिच्या डोक्यांत भिनला.

तिला वाटलं, प्रभाकरानं आपल्या समोर येऊन उभं राहावं. अगदीं पूर्वीचंच रूप घेऊन. मात्र त्याच्या डोळ्यांत सहानुभूति नसावी. किळस असावी. तिरस्कार असावा. आणि गालांत पानाचा भरपूर पिंक जमा करून त्यानं आपल्या तोंडावर थुंकावं. आपल्या बुचड्याला धरून खालच्या गटारांत ढकलून द्यावं.

तिरमिरी येऊन ती जवळच्या खांबावर कोसळली.

" ए शांते, कां वळवळतीस तिथं. जा कि पोऱ्याला सांग लवकर आण. "

खोलींतल्या आवाजासरशीं ती भानावर आली. आणि लाचारीनं कवटाळलेला तिचा देह नाक्याच्या दिशेनं चालूं लागला. तिच्या चालींत संवयीची सहजता होती. कर्तव्याशीं गांठ मारलेली तत्परता होती.....

• • •











# परमेश्वर आणि मी

- कै. चिंतामणराव कोल्हटकर
- डॉ. श्री. शां. आजगांवकर
- ललिता पवार
- श्री. मंजुनाथ शिवराय. नायक

हजारों वर्षे मानवानें जंग जंग पछाडले. पण या सृष्टीच्या सर्वशक्तिमान नियंत्याच्या अस्तित्वाचें गूढ अजून तरी त्याला उकललेलें नाहीं. थोर भक्तजनांना साक्षात्कार झाल्याचे दाखले आहेत आणि सर्वसामान्यांच्या जीवनांत कधीं कधीं अतर्क्य अशा घटना घडून येतात आणि हें गूढ अधिकच गहन होतें. दीपावलीतर्फे महाराष्ट्रांतील विविध क्षेत्रांत अग्रभागीं चमकणाऱ्या कर्तृत्ववान व्यक्तींपासून तों समाजाच्या खालच्या थरांतील व्यक्तींना या विषयाबाबत एक प्रश्नपत्रिका पाठविण्यांत आली. ही प्रश्नपत्रिका पुढें दिलीच आहे. या उपक्रमाला सर्वांनीं मोठें आपुलकीचें सहकार्य दिलें.

**— आमची प्रश्नपत्रिका —**

१—आपला परमेश्वरावर विश्वास आहे का? असेल तर कां? नसेल तर कां नाहीं?

२—आपला धर्मावर विश्वास आहे का? असेल वा नसेल! तर काय म्हणून?

३—आपण प्रतिदिनीं पूजा वा प्रार्थना ह्यापैकीं कांहीं नियमितपणें करतां काय? आपण एखाद्या धार्मिक पुस्तकाचें वाचन करतां काय?

४—आपणांस दैवी अथवा अतिमानवी, म्हणजे ज्याचें स्पष्टीकरण सर्वसामान्य तर्कांच्यें देतां येत नाहीं, असा कांहीं अनुभव आलेला आहे काय?

५—वरील प्रश्नांशिवाय मानव आणि परमेश्वर यांच्या परस्पर संबंधासंबंधीं आणखी कांहीं सांगू शकाल का?

## कै. चिंतामणराव कोल्हटकर

अभिजात अभिनय निपुण, अव्वल दर्जाचे नाट्य-शिक्षक व रंगभूमि आणि चित्रपट या दोन्ही सृष्टींत सारखेंच मानाचें यश मिळविणाऱ्या कै. चिंतामणरावांचा भारत सरकारने सनद देऊन गौरव केला. 'बहुरुपी' हा त्यांचा ग्रंथ म्हणजे मराठी रंगभूमीचा गेल्या शंभर वर्षांचा ललितरम्य इतिहास. तें त्यांनीं लिहिलेलें अक्षर वाङ्मय, त्यांच्या याहि ग्रंथाला पहिलें पारितोषिक मिळालें. दोन्ही बहुमान त्यांना हयातींतच मिळाले, ही तपस्येची फलश्रुति. या सदरासाठीं दीपावलीने धाडलेल्या प्रश्नाचीं उत्तरें त्यांनी लिहून ठेवलीं होतीं. श्री. चित्तरंजन कोल्हटकर यांनी गेल्याच महिन्यात ती आमच्या हातीं दिलीं.



उ. १—माझा परमेश्वरावर विश्वास आहे कारण माझ्यासारख्या वादळात सांपडलेल्या तरुणाला त्याच्या प्रेरणेनेंच उत्कर्षाला पोहचविणारे मार्गदर्शन केलें.

उ. २—मी हिंदु आहे; आणि हिंदुधर्माचे प्रतीक देवतास्वरूप असल्यामुळें त्या धर्मावर माझी अटळ श्रद्धा आहे.

उ. ३—पूजा, प्रार्थनेचा ठराविक विधी मी करीत नाहीं; पण संधी मिळतांच आराध्य देवतेच्या चिंतनांत मी वेळ घालवितों.

उ. ४—नाट्यक्षेत्रांत आयुष्य घालविलेल्या माझ्यासारख्या सामान्य शिक्षणाचा संस्कार झालेल्याला एकाच ग्रंथाबद्दल भारतीय मराठी साहित्याचा परमोच्च पुरस्कार लाभणें ही दैवी घटना मी समजतों.

उ. ५—निरनिराळे वृक्ष, लता, फळें, फुलें, त्यांचे विविध आकार रंग, गंध, रुची या साऱ्यांचा जन्म मातीचे पोटीं, तसेंच नियमितपणें प्रतिदिनीं होणारा सूर्योदय आणि सूर्यास्त हीं सर्व अनुभवून निरीश्वरवाद्यालाहि जन्माला घालण्यास परमेश्वर हा एक चमत्कारच करीत नाहीं कां?

•••



अनुक्रमणिका






अनुक्रमणिका

## डॉ. श्री. शां. आजगांवकर



डॉक्टरकी आणि त्यांतून संशोधनासारख्या रुक्ष व्यवसायांत असतांना देखील साहित्यसेवेत आणि चांगल्या साहित्यिकांच्या कौतुकांत गुंगून राहाणारे एक रसिक. मधुमेहावरचें त्यांचे संशोधन आणि चिकित्सा विख्यात आहे. मालवणचें महाराष्ट्र साहित्य संमेलन रंगले, त्याचें बरेंचसे श्रेय डॉ. आजगांवकरांना जाते.

---

उ. १ — होय. माझी अंतःश्रद्धा परमेश्वर मानते व परमेश्वराच्या अस्तित्वाचा मला जीवनांत पदोपदी अनुभव येतो. पण सर्वच अनुभव शब्दांकित करतां येत नसतात. साखरेची रुची मुक्या माणसाला कळली तरी ती त्याला दुसऱ्याला सांगतां येत नाहीं म्हणून ती त्याला कळलीच नाहीं असें म्हणतां येईल का! तीच गोष्ट ईश्वरावरील श्रद्धेची. सर्वच गोष्टींना तर्काचा निकष लावतां येत नाही. जगांतील मोठमोठ्या पंडितांनी—आस्तिक व नास्तिक—आणि तत्वज्ञान्यांनीं "ईश्वरा"चा पाठलाग केला—पण तो केवळ शब्द-सृष्टीचा फुलोरा. ईश्वरावरील विश्वास हा प्रत्येकाच्या अंतःश्रद्धेचा प्रश्न आहे. उपनिषद् द्रष्टया ऋषींनीही जेथे "नेति नेति" असे त्याचे वर्णन करताना कबुली दिली आहे तेथे ईश्वरविषयक विचार मी मांडणे हें धाष्टर्याचे होईल. परमेश्वर मी श्रद्धेने मानतों.

उ. २—होय! धारयति इति धर्मः। समाज धारणेसाठी धर्माची गरज आहे. आज जेवढी म्हणून स्वतंत्र राष्ट्रें आहेत तीं सर्व त्यांच्या त्यांच्या कल्पनेप्रमाणें धर्माधिष्ठितच आहेत. अधर्मनिष्ठ नाहींत. आज जो पोथिनिष्ठ धर्म समजला जातो अशा पंथाचा मी धर्मनिष्ठ नाहीं. मी जेवढा हिंदुधर्माचा अभ्यासू आहे तेवढाच खिस्ति व बुद्ध धर्माचा. कोणताहि धर्म असत्य बोल, वाईट आचरण कर, समाजविघातक गोष्टी केल्यानें पुण्य मिळते असें सांगत नाही. आपल्या धर्माचे श्रेष्ठत्व दाखविण्यासाठीं व आपल्या कळपांत इतराना ओढण्यासाठीं कांहीं धर्माचे लोक त्या धर्मांतील उच्च तत्वाना पायदळी तुडवितात; तर सामान्य माणसांची स्वार्थामुळे अधर्माकडे प्रवृत्ति होते. "श्रेयस्" आणि "प्रेयस्" मधे मनुष्य बहुशः "श्रेयस्" सोडून "प्रेयस्" कडे धांवतो; व खरा "धर्म" त्याला "श्रेयस्" कडे खेचण्याचा प्रयत्न करतो. असा तो "धर्म" मग कोणत्याही पोथीतला का असेना मला माझ्या हिंदु आर्यधर्माइतकाच आदरणीय वाटतो. "जे जें देखे भूत तें तें पाही भगवंत" ही भागवत धर्माची उच्च विचारसरणी मला विशेष ग्राह्य वाटते.

उ. ३—प्रतिदिनी पूजा व प्रार्थना करण्याची मला आवड आहे पण ती नियमित होतेच असें नाहीं. माझ्याहून ज्या श्रेष्ठ, श्रद्धेय अशा सर्व शक्तीचीच नव्हे तर व्यक्तीचीहि मी आदराने पूजा करतो. "यद् यद् विभूतिमत्सत्वं श्रीमत् ऊर्जितमेववा। तत्तदेवाव। गच्छत्वं मम तेजोंशसंभवम्।" या भावनेने फुले नैवेद्य अशा बहिरुपचारानी मी पूजा करीत नसलों तरी मला आदरणीय व श्रद्धेय अशा शक्तींची व व्यक्तींची मी मानसपूजा करतो.

प्रार्थनेवर माझा विश्वास आहे तो प्रार्थनेने मनोवांछित प्राप्त होते या श्रद्धेने नव्हे तर माझ्यापासून अदूरपण अव्यक्त असलेल्या अशा महान् ईश्वरीशक्तीशी माझा प्रार्थनेच्या योगाने संबंध जुळावा म्हणून. "रेडिओ" चे यंत्र एकाद्या दूरध्वनिक्षेपक "स्टेशन" शी संलग्न करण्यास त्या रेडिओच्या निरनिराळ्या "बटन" अगर किल्लीचा जसा उपयोग तसाच प्रार्थनेचा. प्रार्थनाही अव्यक्त अशा परमेश्वरी शक्तीशी आपला संबंध जुळविणारी किल्ली आहे; व ती किल्ली शहाणपणानें हाताळली तरच आपल्या इच्छेप्रमाणें योग्य ते ईप्सित प्राप्त होते. प्रसिद्ध रशियन शास्त्रज्ञ पॅवलॉवच्या भाषेंत सांगावयाचे झाल्यास प्रार्थना ही, एकप्रकारचा conditioned Reflex आहे; कीं ज्याच्यामुळें आपले मन तीच तीच गोष्ट चिंतित असलें, व शरीर करीत गेलें कीं त्यांत सिद्धि मिळूं शकते. जीवनाला हवें ते वळण मिळूं शकते. पण मुंबईच्या जीवनांत पूर्ण एकांत असा क्वचितच मिळतो की प्रार्थनेत आपण ईश्वराशी तादात्म्य पावण्याचा क्षणभर का असेना अनुभव मिळेल. रात्रीं झोपण्याच्या वेळीं व प्रातःस्नानाचे वेळीं मी ईशप्रार्थना करीत असतों.

तत्त्वज्ञानविषयक पुस्तकांचें वाचन ही माझी आवड आहे व अशा पुस्तकांतील कांहींतरी विषयाचें वाचन केल्याशिवाय मी झोपत नाहीं. त्यांचा मनःशांतिसाठीं फारच चांगला उपयोग होतो. "धर्म ही अफूची गोळी आहे" हे म्हणणाऱ्यांच्या मागे थोडेसें सत्य आहे. झोपेच्या औषधाशिवाय जर अशा पुस्तकांनीं मनःस्वास्थ्य मिळतें तर त्याला त्यांनीं गैरसमजुतीनें जरी 'अफू'ची उपमा दिली तरी अफूचें दुष्परिणाम न होतां मनःस्वास्थ्य मिळते हा कांहीं कमी फायदा नाहीं. व मला वाटतें मनःस्वास्थ्याकरितां हल्लीं बाजारांत सवंग सुकाळ झालेल्या Tranquillisers पेक्षां मन समतोल ठेवण्यास शिकविणाऱ्या तत्त्वज्ञानविषयक धार्मिक पुस्तकांचें वाचन जास्त आरोग्यप्रद होईल. गीता, ज्ञानेश्वरी, तुकारामाचें अभंग, राधाकृष्णनची तत्त्वज्ञान-विषयक पुस्तकें, गीतांजलि अगर इमिटेशन ऑफ ख्रीस्ति सारखी पाश्चात्य संतांची व तत्त्वज्ञानांची पुस्तकें यापैकीं कोणतेहि वाङ्मय मनःशांतीला उपयोगी पडतें. त्यामुळें दररोज काहींतरी खुराक मिळतो व तो मी दररोज न चुकतां घेतों.

### "दीपावली"
### वर्गणीदारांस सूचना :—

या अंकापासून ज्यांची वार्षिक वर्गणी संपते त्यांनी पुढील वर्षाची वर्गणी (रु. १२-५० न. पैसे) १५ तारखेपर्यंत आम्हांस मिळेल अशी पाठविण्याची कृपया व्यवस्था करावी. व्ही. पी. पद्धत नसल्यामुळें ज्यांची वर्गणी जमा झाली नसेल त्यांना पुढील अंक पाठवितां येणार नाहीं.

व्यवस्थापक, **दीपावली**

**उ. ४**—होय. असें अनुभव मधून मधून येतात पण ते विशेष महत्वाचे नाहींत. जे आज आपण अज्ञात व अतिमानवी म्हणून समजतो ते कालांतराने त्याचे मागची भूमिका समजल्याने अतिमानवी म्हणून रहात नाहीं. पण सर्वच ठिकाणी असा अनुभव येत नाहीं व म्हणूनच आजच्या आपल्या ज्ञानाचे दृष्टीने त्यास आपण अतिमानवी ही संज्ञा देतों. अशा प्रकारामध्यें माझी पत्नी "ललिता" हिच्या मृत्यूसमयींचा व त्यानंतरचे तिचे पुनर्दर्शन आणि तिने दिलेल्या आदेशाप्रमाणे घडलेल्या गोष्टींचा अनुभव. "पुरुषार्थ" जून १९५३ चे अंकांत तो सविस्तर दिलेला आहे व त्यानंतरची माहिती त्याच वर्षाचे डिसेंबरचे अंकांत दिलेली आहे. जिज्ञासूनी ते अंक अगर डॉ. वि. म. भट यांचे "योगसिद्धी आणि ईश्वरी साक्षात्कार" हें पुस्तक पहावें. त्यामध्यें सविस्तर माहिती आल्यामुळें येथें पुनरुक्ति करीत नाहीं.

**उ. ५**—उपग्रह निर्माण करणारा, अंतरीक्षाचा ठाव घेणारा, आणि चंद्र मंगळावर वसाहत करण्याचा बेत आखणारा आजचा आधिभौतिक मानव ईश्वराचें अस्तित्वच कबूल करण्यास तयार होईल की काय हा प्रश्न आहे. अज्ञाताची दालनें आधुनिक शास्त्राच्या किल्ल्यांनीं आतां हळू हळू उघडत चालली आहेत आणि मानवाच्या ईश्वरविषयक कल्पनेला हादरे बसत आहेत. पण यावरून सर्व विश्वाचा नियंता, "अधिचालक" कोणी नाहीं व "मानव हाच कर्तुम् अकर्तुम्" अशी कल्पना जर होत असेल तर ती "आसुरी" कल्पना आहे. पंचज्ञानेंद्रियानीं कळतें तेवढेच सत्य ज्ञान ही समजूत कोती आहे कारण त्यांच्या ग्रहणशक्तीलाही कांहीं मर्यादा आहेत. या मर्यादेच्या पलिकडे जी शक्ति आहे—मग तिला आपण कोणतेंही नांव द्या—ती परमेश्वर असें मी समजतों, व "स्थिरचरव्यापुनि अवघा" अशा या शक्तीच्या "चरा" तील मानव हाहि एक अंश आहे. यापेक्षां निकटचा संबंध कोणता पाहिजे! इतर प्राणी व मानव यांत मानवाला बोलण्याची, लिहीण्याची, विचार करण्याची आणि ते व्यक्त करण्याची शक्ति ईश्वराने दिली आहे. या शक्तीमुळेच हे चार विचार आपल्या समोर मांडतां आले. "परमेश्वर सर्वाभूतीं पहाणें" ही समदृष्टी मानवामध्यें आली तर त्याच्यांत आणि मानवांत कांहीं फरक रहाणार नाहीं तर तो मानव आणि दानव याच्यामध्येंच सतत घोटाळत रहाणार!

## ललिता पवार

रंगेल 'मुरली' पासून चढेल 'सम्राज्ञी आनंदीबाई' पर्यंत आणि 'भाजीवाली' पासून अहंमन्य 'घरमालकिणी' पर्यंत अत्यंत यशस्वी भूमिका करणारी गेलीं तीस वर्षे आपली कारकीर्द गाजवणारी सिनेसम्राज्ञी नामवंत दिग्दर्शकानांहि तिच्या मार्गदर्शनाची दाद घ्यावी लागते.

**उ. १**—माझा परमेश्वरावर पूर्ण विश्वास आहे. त्याचं पहिलं कारण म्हणजे मनावर बालपणापासून झालेले संस्कार. पुढें तर्क व बुद्धीलाहि ही गोष्ट पटली. या अफाट विश्वाचं नियंत्रण करणारी कुणी शक्ति असलीच पाहिजे आणि त्याच जगन्नियंत्या शक्तीला मी परमेश्वर समजते.

कलाकृतींच्या जन्मकथा : २



# एका वेड्या कलावंताची कलाकृती

'मानवतावादाचा थोर पुरस्कर्ता' म्हणून व्हिन्सेन्ट व्हॅनगॉग या कलावंताचें नांव चित्रकलेच्या इतिहासांत अमर झालें आहे. त्याच्या चित्रांतून मानवी भावनांचें प्रगटीकरण अतिशय तीव्रतेनें घडलें आहे. केवळ विषयाची निवडच नव्हे तर कुंचल्याच्या फटकाऱ्यांतून आणि रंगांच्या मिश्रणांतूनही त्याच्या भावनाशील स्वभावाची जाणीव प्रेक्षकाला झाल्याशिवाय रहात नाहीं. पण ज्या भावनाशील स्वभावामुळें त्याला कलाइतिहासांत अमरपद लाभलें त्याच भावनाशीलतेमुळें त्याचें स्वतःचें जीवन अतीशय हालअपेष्टेंत गेलें. त्याच्या भावनांउर्मीचा ताण इतका विलक्षण प्रखर ठरला कीं त्यामुळें अखेरीस त्याला वेडाचे झटके येऊं लागले आणि शेवटी तर आत्महत्येंत त्याचें रूपांतर झालें.

व्हॅनगॉगच्या मागें दारिद्र्य हात धुवून लागलें होतें. त्यातच त्याच्या भावनाशील मनाला आवर घालूं शकेल अशी पत्नि त्याला लाभली नाहीं. जन्मभर प्रेमभंगाचे तडाखे त्याला मिळत गेले. जगांतल्या सर्व सुखांना तो आंचवला होता. केवळ कलासक्ति हे असें एकच व्यसन होतें कीं त्या व्यसनाच्या धुंदींत तो स्वतःच्या दुःखांना विसरूं शकत असे. वयाच्या तिसाव्या वर्षी त्याला हें चित्रकलेचें व्यसन जडलें आणि अगदी मरणाच्या अखेरच्या घटकेपर्यंत या व्यसनांत तो बुडून गेला. भुकेला असो कीं वेडाच्या झटक्यांत असो व्हॅनगॉगनें ब्रश कधीं खालीं ठेवला नाहीं. आजारपणाची [illegible] फिकीर केली




नाहीं. एवढेंच नव्हे तर वेड्याच्या इस्पितळांत असताना त्यानें काढलेल्या कांहीं कलाकृती जगप्रसिद्ध ठरल्या आहेत.

व्हॅनगॉगनें स्वतःचीं अनेक चित्रें काढलीं आहेत. पण येथें दिलेलें स्वतःचे चित्र कांहीं विशेष महत्वाचें आहे. या कलाकृतीची जन्मकथा विलक्षण हृदयस्पर्शी आहे!

यावेळीं व्हॅनगॉग सुमारे पस्तीस वर्षांचा होता. त्याच्या तारुण्य-सुलभ भावना करपून गेल्या होत्या. ज्या तरुणीजवळ त्यानें आजपर्यंत प्रेम व्यक्त केलें होतें त्या तरुणींनी त्याची टिंगल केली होती. प्रेमाच्या शोधांत त्याला अपयश आलें होतें. शुद्ध प्रेमाच्या अभावी केवळ वासनांची भूक भागिवण्यासाठीं तो वेश्यांच्या किळसवाण्या सान्निध्यांत दिवस घालवत होता. पण पैशाच्या अभावी त्या वारांगनाही त्याची अनेकदां हेटाळणी करीत असत. अशीच एक वारांगना त्याला हेटाळणीनें एकदां म्हणाली, "तुजजवळ पैसा नसतो तर तूं माझ्या-कडे कशासाठीं येत असतोस?"

व्हॅनगॉग म्हणाला, "माझें तुझ्यावर खरेंखुरें प्रेम आहे."

त्यावर ती वारांगना मिस्किलपणें म्हणाली, "अशा खऱ्याखुऱ्या प्रेमाच्या गप्पा मी आजपर्यंत अनेकांच्या तोंडून ऐकल्या आहेत. तुझें माझ्यावर खरें प्रेम असेल ना तर माझ्यासाठीं एक गोष्ट कर. तुझे कान मला फार आवडतात. त्यांतला एक कान मला बक्षीस दे. त्याशिवाय मी तुझ्या खऱ्या प्रेमावर विश्वासच ठेवूं इच्छित नाहीं."

व्हॅनगॉग निराश होऊन घरीं गेला. पण तिच्या त्या बोलण्याचा त्याच्या मनावर भयंकर परिणाम झाला. 'कान कापून तरी खरेंखुरें प्रेम आपणाला या जगांत मिळूं शकेल कां?' या विचारानें त्याचें डोकें भ्रमिष्टासारखें फिरूं लागलें.

आणि एक दिवस तो मध्यरात्री ताडकन् उठला. हातांत सुरा घेऊन तो आरशापुढें धांवला. त्यानें आपला उजवा कान कापून काढला! रक्ताळलेला तो कान त्यानें स्वच्छ धुतला; कपड्यांत गुंडाळला; आणि तो तडक त्या वारांगनेकडे गेला. वारांगनेनें दार उघडलें तो दारांत व्हॅनगॉग उभा! त्याचा भेसूर चेहरा पाहून ती घाबरली. "तुला हवी असलेली प्रेमभेट आणली आहे." असें म्हणून तो कपड्यांत गुंडाळलेला कान त्यानें तिच्या हातांत दिला. जेव्हां तिनें तो उघडून पाहिला तेव्हां तर तिनें किंकाळीच फोडली आणि धाडकन् दरवाजा बंद करून ती बेशुद्ध पडली.

दाराबाहेर उभा राहिलेला व्हॅनगॉग रक्तानें माखला होता. रक्त-स्रावानें त्याला ग्लानी आली होती. दुसऱ्या दिवशीं तो शुद्धीवर आला तेव्हां तो स्वतःच्या घरी बिछान्यावर पडलेला होता. कानाच्या भागांतून कळा येत होत्या. डोक्याभोंवती बँडेज होते. डॉक्टर जवळ उभे होते. भोंवतालचे लोक म्हणत होते, "हा वेडाचा झटका आहे!"

पंधरा दिवसानंतर व्हॅनगॉग हंथरूणांत बसूं लागला. अखेर कान देऊनही खऱ्या प्रेमाला तो वंचितच झाला होता. त्याच्या जीवनांतलें नैराश्य संपलें नव्हतें. अशा त्यावेळीं त्याला दिलासा देऊं शकेल अशी एकच गोष्ट होती आणि ती म्हणजे-चित्रकला!

त्यानें पॅलेटवर भराभर रंग पिळले. कोपऱ्यांतला कॅन्व्हसचा फलक उभा केला. समोर आरसा ठेवला. पाईप पेटवून ती तोंडांत धरली. आणि आरशांत दिसणारें स्वतःचें प्रतिबिंब तो चित्रित करूं लागला. व्हॅनगॉगनें त्या दिवशीं जें चित्र काढलें तेच इथें दिलें आहे.

कानाभोंवती बँडेज बांधलें आहे. चेहरा आजारपणानें सुकला आहे. तोंडांतल्या पाईप मधला धूर जगाबद्दलची बेफिकिरी दाखवतो आहे. डोळ्यांत भेसूर कारुण्य उमटलें आहे—हें चित्र म्हणजे व्हॅन-गॉगच्या करुण कहाणीचें प्रतिबिंब आहे.

—भय्यासाहेब ओंकार

● ● ●

उ, २—दुसरा प्रश्न एका दृष्टीनें पाहिल्यावर अवलंबून आहे. परमेश्वराची कल्पना थोडक्यांत म्हणजे सर्व सद्गुणांचा आणि मांगल्याचा ठेवा अशीच मी मानते. धर्मांत ईश्वरमान्य अशा पुण्याचा, पुण्य मार्गाचा आणि नीतितत्वांचा विचार असल्यानें परमेश्वर मानणाऱ्या मनुष्याची धर्मावर साहजिकच श्रद्धा असते.



उ. ३—नियम म्हणून मी कोणत्याच धार्मिक पुस्तकांचं वाचन करीत नाहीं. पण आपलं वातावरणच असं आहे कीं धार्मिक ग्रंथांत सांगितलेल्या नीतितत्वांची, पाप-पुण्याची, चांगल्या वाईटाची माहिती सहजच होते. ईश्वरकृपेनें विचारशक्ति बरी आहे. तसेंच सत्समागम आणि श्रवण ह्या बाबतीतहि मी भाग्यवान आहे. जगाचं अवलोकन हें मात्र माझ्या नित्य पाठांतलं पुस्तक आहे.

उ. ४—अशक्य अशा घटना सर्वांच्याच आयुष्यांत घडत अस-तात. तशा माझ्याहि जीवनांत घडल्या असतील. अर्थात् त्यांना कार्य-कारण भाव सांगतां येत नाहीं. साधुसंतांवर माझा विश्वास आहे. त्यांच्या दर्शनांत पावित्र्याचें संस्कार होऊन मनाला शांति लाभते. चमत्कार हें साधुत्वाचं गमक असं मी मानीत नसल्यानें तर्कातील अनुभवां-संबंधीं मला सांगतां येणार नाहीं. शिवाय तो वैयक्तिक श्रद्धेचा विषय असल्यानं त्याची सार्वजनिक चर्चा करणंहि बरं नाहीं.

उ. ५—वरील चार प्रश्नांचीं उत्तरं दिल्यावर ह्या प्रश्नाविषयीं स्वतंत्र असं काय सांगणार? अनेक लोक अनंत प्रकारांनीं परमेश्वरा-

कडे पाहातात. पण मी व्यक्तिशः त्याला जगन्माता समजतें. ती माझी आई आहे—सर्व विश्वाची आहे. मातृत्वाच्या सर्व सुंदर, प्रेमळ, मंगल कल्पनांचा कळस म्हणजेच परमेश्वर ! ● ● ●

## श्री. मंजुनाथ शिवराय नायक



श्री. नायक मराठी वाङ्मयाचा एक नादी, साहित्यप्रेमी अभ्यासू आणि रसिक वाचक. मासिकें, पुस्तकें आदिंची स्वतःची एजन्सी. सध्यां आपल्या वडिलांच्या वसई येथील उपहारगृहाच्या धंद्यांत त्यांना मदत करीत असतात. वसईतील सामाजिक आणि सांस्कृतिक चळवळींतील एक कार्यकर्ते.

---

थोरामोठ्यांनीं हजेरी लावलेल्या ह्या सदरांत मजसारख्या सामान्य माणसानें लिहीणें तितकेंसें सुयोग्य दिसत नाहीं. पण संपादकांनीं केलेल्या विनंतीला मान दिला तो केवळ ह्या सदरामागील उद्दीष्टाचें महत्त्व लक्षांत घेऊनच आणि तेवढ्याखातरच मी ह्या प्रश्नांचीं उत्तरें देत आहे.—

उ. १. परमेश्वर आहे हें मी निश्चितपणें मानतों. कोणी ह्या गोष्टीला पुरावा विचारील तर तो मला देतां येणार नाहीं. परमेश्वर देहस्वरूपानें वावरत असेल असें नाहीं; पण वनस्पति, पशुपक्षी आणि सृष्टीचे इतर नमस्कार–चमत्कार आदि निर्वेधपणें चाललेले व्यवहार पाहिले कीं, ह्या सर्वांपाठीं इतकें सर्व सुरळीत निमुटपणें चालविणारी एकादी शक्ति किंवा याचा कोणीतरी नियंता असावा हें कोणालाहि मान्य करावें लागेल.

उ. २—धर्म किंवा पंथ हे मानवनिर्मित आणि आपापल्या गटांच्या सोयीसाठीं—अन क्वचित् ठिकाणीं स्वार्थासाठीं– राबविले जात आहेत. खऱ्या धर्माचें उद्दिष्ट हें नव्हे. तुळशीचीं लांकडें गळ्यांत घालून अन् सर्वांग भस्म-शेंदूर चर्चुन कोणाहि भोळ्याभावड्या अशिक्षितास—गरिबास फसवावें आणि मिळालेल्या पुंजीपासून आपलें उखळ पांढरें करून घ्यावें याला मी धर्म म्हणत नाहीं. माणुसकी अंगीं बाणवून ती आचरणें ह्यालाच मी सर्वश्रेष्ठ धर्म मानतो.

उ. ३—पूजेचे बाह्य सोपस्कार सोडून मी अनन्यभावें प्रार्थना ही रोज थोडा वेळ करतोंच; वेळ मिळेल त्यावेळीं अनियमितपणें धार्मिक पुस्तकांचें वाचनहि करतोंच. नित्य नवें ज्ञान संपादणें किंबहुना नवीन वाङ्मयाचें वाचन मनन ज्ञानसाधना हीच सर्वश्रेष्ठ पूजा होय असें मी मानतों आणि ती मात्र नियमीतपणें करीत असतों.

उ. ४—दैवी किंवा अतिमानवी अनुभव मी पुष्कळसे स्वतः अनुभवले आहेत. एकादा अनुभव येथें सांगून कोणाचीहि एतद्विषयक जिज्ञासा शमवितां येणार नाहीं. तद्वतच कांहीं अनुभव हे मजपुरतेच मर्यादित असल्यामुळें ते मी येथें सांगण्याचें प्रयोजन नाहीं. अनन्यभावें निष्ठा ठेवून ईश्वरास शरण जाणाऱ्या प्रत्येक व्यक्तीस असा वैयक्तिक अनुभव आल्याखेरीज राहणार नाहीं.

उ. ५—गोरगरिबांविषयींची कणव, दीनदुबळे अपंग यांना शक्य तितकें सहाय्य, दुसऱ्यांच्या दुःखांत सहभागी होणें अन् आपापल्या कर्तव्यांत, व्यवसायांत सचोटीचें-इमानाचे तत्त्व ठेवणें हीं मानव आणि परमेश्वर ह्यांत निकटत्व घडवून आणणारीं मूलतत्त्वें होत असें माझ्या अल्पमतीला वाटते. कविश्रेष्ठच सांगून गेला आहे कीं, वैष्णवजन तो तेने कहिये जो पीड परायी जाणे रे ! ● ● ●

---

[ पान १३ वरून चालू ]

( आपल्या बायकोकडे पहात ) हिचे आजोबा तुमच्या भारतांतून–मलबारमधून इथं आले म्हणे. या मुकन्येला तर आम्ही क्लिंग म्हणतो ! '

' म्हणजे ? ' मी उद्गारलों.

' आमच्या मलायांत ब्रिटिश राजवटींत हिंदी माणसाला तिरस्कार-दर्शक अर्थात् क्लिंग म्हणत. युद्धकाळांत जपान्यांनी ब्रिटिशांना हांकललें नि सुभाषबाबूंनी सिंगापुरांत आझाद हिंद राज्य पुकारलें तेव्हां त्यानीं या क्लिंग शब्दावर बंदी घातली. आतां ब्रिटिश परत आलेले असले तरी आम्ही हा शब्द वापरीत पण ही मुकन्या चांगली उजळ आहे. आणि विशेष म्हणजे तिचे डोळे आम्हां मलायीसारखे बारीक नाहींत. तुम्हा हिंदी लोकांच्या सारखे चांगले मोठे आहेत म्हणून थट्टेनें आम्ही तिला केव्हां केव्हां क्लिंग म्हणतां ! '

बारा सव्वाबाराच्या सुमाराला आम्हीं परत फिरलों. अब्दुल्ला वाटेंत सचिवालयांत गेले. कॉजवेकडे येत असतां जोहोरबारूतल्या एका दुकानावर ' भारत स्टोअर्स ' अशी इंग्रजी पाटी दिसली. एका चहाच्या दुकानावर ' केरल रेस्टोरां ' अशी पाटी होती, आणि आंत मल्याळी नोकर दिसत होते. ● ● ●



# व★च★न★पूर्ति★

**( तेलगु लोककथा )**

## पूर्व सूत्र

मगधदेशाचा राजा कनकेश्वर याला यज्ञदेवतेनें दिलेली कन्या 'मदनरेखा' हिची ही कथा. पौगंडावस्थेंत गुरुगृहीं विद्याभ्यास करीत असतांना 'चंडी' नांवाच्या गुरुपुत्राचें हिच्यावर प्रेम बसलें. राजकन्येला त्याची जाणीवहि नव्हती. पुढें एकदां राजकन्येची आणि गुरुपुत्र चंडीची एका एकांतस्थळीं गांठ पडली असतांना संधी साधून चंडीनें तिच्याशीं अतिप्रसंग केला; परंतु लग्नानंतरच्या पहिल्या रात्रीं आपल्या पतीचा स्पर्श व्हायच्या आधीं चंडीकडे यायचें विचित्र वचन देऊन त्याप्रसंगांतून राजकन्येनें आपली अब्रूनिशीं सुटका करून घेतली. त्यानंतरचा हा कथा भाग....

---

'लग्नानंतरची पहिलीच रात्र जो माझं म्हणणं मान्य करील, तेवढी एकच रात्र जो माझ्या इच्छेच्या हांकेला साद देईल, त्याच्याच गळ्यांत मी माळ घालीन. आणि त्या रात्रीनंतर मी त्याची जन्माची दासी होईन!' असा विचित्र 'पण' मदनरेखेनें जाहीर केला खरा; परंतु नानाप्रकारच्या शंकाकुशंकांनी तिचें मन ग्रासलें. वर्षाकालांतल्या काळ्याकभीन्न मेघांसारख्या त्या शंका पुनः पुन्हां दाटून येत. तिला भेडसावीत. तिला भूक तहान लागेनाशी झाली, तिची झोंप उडाली. सारी रात्र ती सुस्कारे सोडी. गवाक्षांतून सहज बाहेर नजर टाकली, तर काळोखाच्या देवळांत गप्प बसलेलीं फुलझाडें देखील तिला भुतासारखीं वाटत. आणि मग शय्येवर उठून बसून संकटांतून सोडवण्याबद्दल ती परमेश्वराचा धांवा करी. "हे देवाधिदेवा कुठल्या कुयोगावर तूं माझी आणि चंडीची भेट घडवून आणलीस? लहानपणापासून कसलंहि पाप माझ्या हातून घडलं नाहीं. किंवा चंडी माझा पति व्हावा असंहि मला कधीं वाटलं नाहीं. किंबहुना त्याच्याबद्दलची कसलीच विकारी भावना माझ्या मनाला शिवली नाहीं. आणि असं असून, मला हे क्लेश कां सहन करावे लागतात?" एखाद्या वेळीं तिला वाटे, धांवत जावें, वडिलांच्या कुशींत शिरावें, झाली गोष्ट त्यांच्या कानावर घालावी, आणि मोकळें व्हावें; पण परिणाम भलताच झाला तर? ज्यानीं आतांपर्यंत आपल्याला फुलासारखें जपलें, आपल्याला जरा दुःख झालें तर ज्याची आकाश कोसळल्यासारखी स्थिती होते, त्याला ही गोष्ट कळली तर...' जो शांत असला तर जलाशयासारखा; पण जो कोपला तर रुद्रासारखा आहे, असा आपला पिता काय करील नेम आहे का? चंडी दंडाला पात्र होईल. तो सहज दंड सहनहि करील; पण आपण दिलेल्या वचनाचें काय? वचनपूर्ति करणें हा राजधर्म आहे. नको, तो विचार नको! असें म्हणून ती दैवावर हवाला ठेवून गप्प बसे.

स्वयंवराचा दिवस उजाडला. आणि आपल्याला पसंत असलेल्या अवंति नगरीच्या राजकुमार जयसेनच्या गळ्यांत मदनरेखेनें माळ घातली. राजकन्येच्या लग्नसमारंभांत साऱ्या मगधदेशांत आनंदाची कारंजी उडालीं. सालंकृत दासदासी, हत्ती, घोडे, रथ आदि लव्याजम्यासह वधुवरांची मिरवणूक राज्याच्या सीमेपर्यंत आली तेव्हां राजा कनकेश्वरांनीं आतांपर्यंत रोखून धरलेल्या अश्रूंना वाट मोकळी करून दिली. पित्याच्या वक्षस्थलावर मान ठेवून मदनरेखाहि शोकाकुल झाली.

"जा बाळ जा, राजधर्म कुलधर्म संभाळून दोन्हीं कुलांना भूषण हो! माझी आठवण तुझ्याजवळ राहावी म्हणून मीं माझी अश्वपरिक्षेची विद्या तुला देत आहे. संकटसमयीं तिचा तुला उपयोग होईल!" असें म्हणून राजा कनकेश्वरांनी तिला आपली अश्व-






परिक्षेची विद्या दिली आणि राजकुमार जयसेनाच्या रथाच्या घोड्यांनीं मगधाची सीमा ओलांडली.

× × × ×

सोळा श्रृंगारांनीं सजवलेल्या स्वर्गांगनेसारख्या मदनरेखेला दासींनीं फुलांच्या पायघड्यांवरून चालवत आणली आणि हास्याच्या लकेऱ्या सोडत हळूंच शय्यागृहांत ढकलून दार लावून घेतलें. तिची छाती धडधडत होती. ज्या प्रसंगाची आतांपर्यंत तिनें केवळ वाटच पाहिली होती, तो प्रत्यक्ष येऊन ठेपला होता. आतां त्या गोष्टीचा सोक्षमोक्ष होणार होता.

फुलांनीं सुशोभित केलेल्या रत्नजडित मंचकाजवळ उभा राहून आपले दोन्हीं बाहू पसरून जयसेनानें तिला गोड हांक मारली—

" मदनरेखे "

तिनें साद दिली नाहीं. खालीं मान घालून ती दरवाजाजवळच उभी राहिली होती. तिचा उर भरून आला होता. डोळ्यांतून पाण्याच्या धारा वाहात होत्या. काय बोलावें, कसें बोलावें या विचारांनीं ती गोंधळून गेली होती. एक एक पाऊल पुढें टाकीत जयसेन तिच्या जवळ येत होता.

" ये अशी जवळ ये. आणि तुझी इच्छा सांग. तुझं कोणतंहि म्हणणं मी मान्य करीन. माग, जें इच्छेला येईल तें माग. तें पुरविण्यांत मला आनंद वाटेल. कां ? तुला माझ्या जवळ यावंसं वाटत नाहीं. तशी तुझी इच्छा नसेल, तर मी तुला दुखवणार नाहीं; परंतु याचं कारण तरी मला कळूं देशील मदनरेखे..."

असें म्हणून तिची हनुवटी धरायला तो हात पुढें करणार इतक्यांत झटक्यानें मदनरेखा मागें झाली.

मान वर करून आंसवांनी भरलेल्या डोळ्यांनीं जयसेनाकडे पाहत तिनें गुडघे टेकले, दोन्ही हात जोडले आणि हुंदके देत ती म्हणाली,

" माझ्या परमेश्वरा, थांबा मला स्पर्श करूं नका. अगोदर माझं म्हणणं काय आहे तें ऐकून घ्या. माझा पण तुम्हीं मान्य केलेला असला तरी आतां सर्वथैव मी तुमची झालें असल्यानें, माझ्या म्हणण्याचा निर्णय जो तुम्हीं द्याल तो मला शिरसावंद्य आहे; पण आधीं निर्णय द्या आणि नंतर मला स्पर्श करा."

" सांग रेखे सांग. तुझं म्हणणं काय आहे तें लवकर सांग. मी अधीर झालेलों आहे. मी योग्य निर्णय देईन. अनुचित असं कांहींहि माझ्या हातून घडणार नाहीं, असं मी तुला वचन देतों. आतां तरी सांगशील ?"

" ऐका "

असें म्हणून घडलेली सारी हकिकत सांगून झाल्यावर ती म्हणाली,

" राजेश्वरा जें सारं घडलं तें अकल्पित होतं. माझं कौमार्य त्या दिवशीं धोक्यांत होतं. कशी तरी मला माझी सुटका करून घ्यायची होती. येऊं नयेत ते शब्द माझ्या मुखावाटे बाहेर पडले. आणि मी वचनबद्ध झालें. दुसऱ्या कोणत्याहि मार्गाचा मी अवलंब केला असता तर मी कुलकलंकिनी ठरलें असतें. आम्हां दोघांखेरीज ही गोष्ट अजूनहि अज्ञात राहिली याचं कारणहि तेंच. जातांना तो छद्मीपणानें हंसला होता. 'प्रचीति घ्यायची आहे' म्हणाला होता. तो, ब्राह्मणपुत्र, मी आतां राजपत्नी आहे माझ्या व्यक्तित्वाला तें आव्हान आहे. एक वेळ चुकून माझ्या तोंडून शब्द बाहेर पडले. मी वचनबद्ध झालें." इतकें सांगून पुढें ती म्हणाली जें कांहीं सांगायचें होतें तें माझें म्हणणें मीं तुम्हांला सांगितलें, आतां तुम्हीं हवा तो निर्णय घ्या किंवा माझा शिरच्छेद करा !"

सारा इतिहास ऐकून जयसेनाचें मन विषण्ण झालें. त्याला उभें राहवेना. मंचकाजवळ जाऊन त्यानें आधार घेतला आणि मान पाठीस टेकून एक दीर्घ श्वास सोडला, विलक्षण, विलक्षण ! असे शब्द त्याच्या मुखावाटे बाहेर पडले.

" नका असा सुस्कारा टाकूं नका. मी चांडाळणीनं तुम्हांला दुःख दिलं, परंतु आतां प्रत्येक क्षण मोलाचा आहे हें लक्षांत घ्या सत्व राखणं हा राजधर्म आहे. सत्यासाठीं राजा हरिश्चंद्रानें सर्व राज्यावर पाणी सोडलें. रामचंद्रानें वनवास पत्करला, पांडवांनीं दारुण क्लेश भोगले—ही सारी परंपरा महाराजांना मीं सांगितली पाहिजे असं नाहीं. ईश्वरावर माझा विश्वास आहे. तो सर्व संकटांतून पार पाडून ब्रीद राखील. आतां विलंब लावूं नका. महाराज मला निर्णय द्या."

---

## बहोत ट्रिकवाला था



गंगाधरशास्त्री पटवर्धन हे उत्तर पेशवाईतील एक मुत्सद्दी १८ जुलै १८१५ रोजीं पंढरपूरला त्याचा खून झाला. यानीं स्वतःचें आत्मवृत्तहि लिहून ठेवलें आहे. शास्त्र्यांबद्दल माऊंट स्टुअर्ट एलफिन्स्टन म्हणतो—

" गंगाधरशास्त्री हा मोठा धूर्त आणि बुद्धिमान आहे. त्यानें बडोदें संस्थानची उत्तम व्यवस्था ठेवली आहे. येथें पुण्यास तो पुष्कळ खर्च करून मोठ्या मिजाशींत राहातो व आपली स्वारी अशा झोकांत काढतो कीं सर्व शहर त्याच्याकडे पाहात राहातें ! जुन्या पद्धतीचा शास्त्री असला तरी थेट इंग्रज असल्याप्रमाणें ऐट करतो. तुरतुर चालतो, तडतड बोलतो, वाटेल त्याला उलट उत्तर देतो पेशवा व त्याचे कारभारी यांना मूर्ख म्हणतो 'डॅमरॅस्कल' हा शब्द त्याचे तोंडी फार आहे, बोलतांना मधून मधून इंग्रजी शब्द खूप घुसडून देतो ( विविधज्ञान विस्तार वर्ष ६१ वें. पृष्ठ ३६५ )

" शास्त्रीबोवांचें हिंदुस्थानीमिश्रित इंग्रजी भाषेचें ज्ञान "यशवंतराव होळकर बहोत ट्रिकवाला था, लेकिन बढा अक्लमंद काक आय था" या वाक्यावरून दिसतें—"

( जुन्या ऐतिहासिक गोष्टी पृष्ठ ५० )

" जा, मदनरेखे, तूं तुझी वचनपूर्ति कर. स्त्री चरित्र काय असतं, याची कल्पना त्या ऋषिकुमाराला नाहीं; पण एवढ्या अपरात्रीं तूं जाऊन परत कशी येशील ? "

" त्याची काळजी करूं नका. सुदैवानें माझ्या वडिलांनीं अश्वपरिक्षेची विद्या मला दिलेली आहे. रात्र सरायच्या आंत मीं परत येईन. "

अश्रुपूर्ण नेत्रांनीं आपल्या पतीच्या थोर मनाचें कौतुक करीत मदनरेखेनें जयसेनाचा निरोप घेतला.

× × × ×

घनघोर जंगलांतल्या मिट्ट काळोखांतून मदनरेखेचा घोडा वायुवेगानें जात होता. आतां कांहीं क्षणानींच ती चंडीजवळ पोंचणार होती. इतक्यांत मेघांचा गडगडाट व्हावा तसें एक भेसूर हास्य तिच्या कानावर आदळलें. एकदम तिच्या घोड्याची गति कमी झाली. आणि घोडा थांबला. तिच्या समोर एक विशालकाय राक्षस उभा होता.

" कोण तूं ? सोड माझी वाट, मला जाऊं दे ! "

" हा ! हा ! हा ! हा ! मला ओळखत नाहीं असं या आसमंतांत कुणी असेल असं मला वाटत नाहीं; पण ज्या अर्थी तूं मला कोण म्हणून विचारतेस त्या अर्थी तुला माझी ओळख नाहीं. परंतु या ब्रह्मराक्षसाची ओळख तुला आतां पटेल. " असें म्हणून तो किंचित् खालीं वांकला आणि आपला ढालीएवढा पंजा तिला पकडण्याकरतां त्यानें पुढें केला; पण एकदम मागें सरून मदनरेखा म्हणाली,

" ब्रह्मराक्षसा, थांब. मला स्पर्श करूं नकोस. मी परस्त्री आहे. परस्त्रीला बहीण मानावं असं धर्मशास्त्र सांगतं. तूं मला आपली बहीण मानूं शकणार नाहींस काय ? "

पुन्हां एकदां हास्याचा गडगडाट करीत ब्रह्मराक्षस म्हणाला,

" माझ्या प्रिय भगिनी, तूं कोण आहेस ? एवढ्या अपरात्रीं अशा अटव्य रानांतून निर्धास्तपणें प्रवास करणारी तूं कोण ? तुझं नांव काय ? तुझा पति कोण ? आणि तूं कुठं चाललीस ? "

" मगध देशच्या कनकेश्वर राजाची मी कन्या असून, अवंतीच्या राजकुमार जयसेनाची मी पत्नी आहे ! " असं सांगून मदनरेखेनें आपला सर्व इतिहास त्या ब्रह्मराक्षसाला विदित केला आणि पुढें म्हणाली—

" ब्रह्मराक्षसा दिलेल्या वचनाचं पालन करणं हा राजधर्म आहे. त्याहून दुसरा श्रेष्ठ धर्म नाहीं. शिवाय हें सर्व पुरं करून रात्र संपायच्या आंत मला पतिचरण प्रक्षाळनाकरितां उपस्थित झालं पाहिजे. प्रत्येक क्षण मला मोलाचा आहे. तस्मात मला जाऊं दे ! माझी वाट सोड ! " तिची ती सर्व हकिकत ऐकून झाल्यावर एक विकट हास्य करीत ब्रह्मराक्षस म्हणाला—

" हे राजस्त्रिये, तुमचें हें नाटक ऐकून, तुम्हीं सर्व मंडळी बहुदा वेड्यांच्या नगरांत राहात असावींत, असें मला वाटतें. एका यःकश्चित ब्राह्मणाच्या पोराला दिलेलें वचन पाळण्याकरितां तूं एवढं दिव्य करायला तयार झालीस काय आणि तुझा तो नेभळट पति तुला अशा अपरात्रीं वचनपूर्तिकरितां जाऊं देतो काय, माझा कशावरच विश्वास बसत नाहीं. मानलेल्या भावा-बहिणीच्या नात्याचं एक उत्तम उदाहरण तूं आत्तांच मला सांगितलेंस. छे ! छे ! छे ! छे ! आपली तर अक्कल गुंग झाली. कांहींका असेना. मला त्याच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं. आज कित्येक दिवसांपासून मला मानवाचं भक्ष्य मिळालेलं नव्हतं. आणि मला आतां फार भूकहि लागलेली आहे. अजूनपर्यंत राजस्त्री मी खाल्लेली नव्हती. मी तुला खाणार ! मी तुला खाणार ! " असं म्हणून तो अधिक खालीं वांकला.

" ऐक, ब्रह्मराक्षसा. दुसऱ्याची भूक भागवणं यासारखं महत्पुण्य दुसरं नाहीं. भुकेलेल्याला अन्न देणं हाहि एक राजधर्म आहे; परंतु त्या आधीं मला माझी वचनपूर्ति करूं दे. मी जाऊन येईं तोंपर्यंत तूं इथंच थांब. आणि नंतर मला सावकाशीनं खा ! "

" हा ! हा ! हा ! हे हुशार स्त्रिये, तूं काय मला दुधखुळा समजलीस ? म्हणे वचनपूर्ति करून येतांना खा; परंतु माझा तुझ्या वचनावर विश्वास नाहीं. अशाच एका स्त्रीच्या वचनावर विश्वास ठेवल्यानें मी ब्रह्मराक्षस झालों. स्त्री म्हणजे माझी शत्रू ! मी तुला खाणार. देव, दानव जरी तुझ्या मदतीला धांवून आले तरी त्यांना निर्दाळून त्यांच्या डोळ्यांदेखत मी तुझे तुकडे तुकडे करून खाईन ! "

" तुझ्या शक्तीबद्दल मला शंका नाहीं. आजपर्यंत मी ब्रह्मराक्षसांच्या अनेक गोष्टी ऐकलेल्या आहेत. ते कोपले तर काय करूं शकतात आणि सामान्य माणसाशीं वचनबद्ध झाले तर ब्रह्मांड त्यांच्या पायाशीं कसं उभं करतात हेंहि मला माहिती आहे. शास्त्र पढलेले ते ब्रह्मराक्षस. त्यांना अनेक विद्या येतात हेंहि मला माहीत आहे. म्हणून म्हणतें अशा थोर आत्म्याचें भक्ष्य होण्यांत मला आनंदच वाटेल पण अखेरची इच्छा म्हणून फक्त मला माझी वचनपूर्ति करून परत येऊं दे. मी पंचमहाभूतांची शपथ घेऊन सांगतें, मीं तुला फसवणार नाहीं. एखाद्याला वचन देऊन फसवणें ही राजनीति नाहीं. म्हणून म्हणतें मला जाऊन येऊं दे ! कृपा कर ! एक क्षणहि गमावूं नकोस ! "

" राजस्त्रिये, प्रसंगीं देवसुद्धां खोटं बोलतात. तेव्हां सामान्यांची काय वाट; तूं पंचमहाभूतांची शपथ घेतलीस म्हणून तुला जाऊं देतों; पण लक्षांत ठेव, राजस्त्रियेनें शपथ घेणं, ही सोपी गोष्ट नाहीं ! जा. आणि लवकर परत ये ! "

पडत्या फळाची आज्ञा घेऊन मदनरेखेनें घोड्याला इशारा केला आणि आल्याच्या दुप्पट वेगानें ती काळोखांत नाहींशी झाली.

(क्रमशः)




✳ आपल्या कौटुंबिक आरोग्यासाठीं
आतां मिळूं लागली...

★ डोंगरे यांचीं *नवी* औषधें

**बाळंत काढा** नं.१ व नं.२ **बाळकडू**
**कुमारी आसव** नं.३ **ग्राईप वॉटर**

★ आणि नव्या




अधिक सुरक्षित आवरणांत

# डोंगरे बालामृत

के. टी. डोंगरे आणि कंपनी प्रा. लि. ८२, मेडोज स्ट्रीट, मुंबई-१.



*१ ऑगस्ट ही लोकमान्यांची पुण्यतिथी ! चाळीस वर्षांपूर्वी लोकमान्यांच्या मृत्यूनें सारा देश हादरला. अशाप्रसंगीं महाराष्ट्राचे ओजस्वी आणि झुंझार पत्रकार कै. अच्युत बळवंत कोल्हटकर यांच्या ज्वलंत लेखणींतून बाहेर पडलेला हा लेख म्हणजे मराठी वाङ्मयाचें एक अमोल लेणें—*

# लोकमान्यासाठीं परमेश्वरसुद्धां धायधाय रडला !

### शोकाचा अग्नि

सर्व अग्नींमध्यें विझविण्यास अत्यंत कठीण अग्नि म्हणजे शोकाचा अग्नि होय. जगांतील सर्व अग्नि विझतील, सर्व प्राणिमात्रांस गांजणारा अग्नि सहज उपायानें शांत होईल, उदकांच्या महासंचयामध्यें सुद्धां वडवाग्नि उपशम पावले, परंतु विरहाच्या योगानें उद्दीप्त झालेल्या दुःखाग्नीच्या ज्वाला कधींहि कमी होणार नाहींत. आणि त्यांतहि हा विरहाग्नि जर अशा एका प्रियतम व्यक्तीच्या विरहाच्या योगानें निर्माण झालेला असेल, कीं त्या व्यक्तीच्या प्रेमाला पार नाहीं, तर त्याच्या धगधगीत जिव्हा, काय देह करपवतील, कीं काय हृदय करपवतील, कीं काय व्यक्ति-भावनांशीं निबद्ध असलेल्या जगाला आग लावतील, त्याचा कांहीं एक नियम नाहीं. विरहानें व्याकुल झालेल्या व्यक्तीला काय दिसतें ? त्या व्यक्तीला ह्या सर्व जगांत,



आगडोंबाळी वणवा दिसत असतो. त्याला वाटतें कीं नगराला आग लागलेली आहे, त्याला वाटतें कीं आप, तेज, वायू ह्या सर्वांनीं पेट घेतलेला आहे, त्याला वाटतें कीं हें सर्व ब्रह्मांड "होळी" च्या स्वरूपांत चेतलेलें आहे, त्याला वाटतें कीं परमेश्वरानें आपलीं सर्व रूपें सध्या बंद केलेलीं असून अग्नि, भयंकर अग्नि, सर्वभक्षक अग्नि, सर्वांचा स्वाहा करणारा अग्नि, सर्वांची होळी करणारा अग्नि, परमेश्वरानें हें आपलें एकच स्वरूप शिल्लक ठेवलें आहे. 'कालोऽस्मि लोकक्षयकृत् प्रवृद्धो । लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः ।' परमेश्वरानें आपल्याच मुखानें आपल्या भीषणतेचें केलेलें वर्णन जर केव्हांहि यथार्थ लागू होत असेल, तर तें अशाच वेळीं होय, आणि विरहदुःखा-दुःखामुळें परमेश्वराचें हें वर्णन डोळ्यापुढें उभें राहिलें म्हणजे भीतीनें हृदय धडकून अर्जुनाप्रमाणें डोळे जे एकदां घट्ट मिटले जातात ते मग खुद्द परमेश्वरच त्या तिमिरांतून जागें करावयास येईपर्यंत उघडले जात नाहींत.

लो. टिळकांच्या स्वर्गवासामुळें महाराष्ट्राच्या स्थितीची जी अत्यंत व्याकुळ अवस्था झालेली आहे. तिची अतिशय अल्प रूपरेषा जर दाखवावयाची असेल तर ती वरीलप्रमाणें दाखवितां येईल. परंतु ती केवळ रूपरेषा कसली ? ही नुसती पुसट छाया आहे. पण त्यांत पुसट छायाहि येत नाहीं, ह्यांत छायेची अत्यंत अंधुक अशी प्रतिछाया आहे. प्रतिछायाहि काय ? पण ह्यांत प्रतिछायेचा अस्पष्ट असा अंश आहे. वास्तविक पहातां, लोकमान्यांच्या स्वर्गवासानें महाराष्ट्राची जी करुण स्थिति झाली आहे, तिचें वर्णन सुद्धां करतां यावयाचें नाहीं. लोकमान्यांच्या मृत्यूनें मोठमोठे वीर दीन गाई बनलेले आहेत. लोकमान्यांच्या मृत्यूनें सदा उल्हसित असलेलीं अल्पवयी बालकांचीं मुखकमलें कोमेजून गेलेलीं आहेत, लोकमान्यांच्या मृत्यूनें सूर्याच्या तीग्मतीक्ष्ण शोकाच्या काळ्या रेषांची छटा मारूं लागलेली आहे. लोकमान्यांच्या मृत्यूनें सह्याद्रीच्या पाठीचा कणा वांकून गेलेला आहे. लोकमान्यांच्या मृत्यूनें कृष्णाकांठच्या कणखर जोंधळ्यांतला कणखरपणा लोपून गेलेला आहे. लोकमान्यांच्या मृत्यूनें लोखंडाचें मेण झालेलें आहे, वज्राचा कापूस झालेला आहे, निर्धारांची कपास झालेली आहे, आणि लोकमान्यांच्या स्वर्गवासानें शेषावर पहुडलेल्या नारायणालाही इतक्या जोराचे हुंदके आलेले आहेत कीं त्यामुळें महाराष्ट्राची विभवलक्ष्मी मुळुमुळू रडायला लागलेली आहे, शेषाला कोंपरखळ्या बसून त्याच्या अंगांतून रक्ताच्या चिळकांड्या उडालेल्या आहेत, आणि त्यामुळें नाभिकमळाश्रित ब्रह्मदेव इतक्या जोरानें चेंडूसारखा वर उडून गेलेला आहे कीं त्यामुळेंच, वाचकहो, त्यामुळेंच आम्ही वर म्हटल्याप्रमाणें त्याचें कडासन कडाडून गेलेलें आहे.



अनुक्रमणिका





## महाराष्ट्रांतील हाहाःकार

लोकमान्यांच्या स्वर्गवासामुळें महाराष्ट्रांत कोणत्या प्रकारचा हाहाःकार उडालेला आहे, ह्याची यथार्थ कल्पना खरोखर कोणालाहि करतां यायची नाहीं. एवढे लोकमान्य गणिती, पण त्यांनासुद्धां ह्याचें गणित कधींहि करतां आलें नसतें. त्यांना जर तें गणित करतां येतें, तर महाराष्ट्राला धाय मोकलीत रडत बसवून त्यांनी खरोखर महाराष्ट्राचा त्याग केला नसता. आज महाराष्ट्रांतील प्रत्येक घर पहा, प्रत्येकावर अशी कळा आलेली आहे कीं जणूं कांहीं प्रत्येक घरांतील एक एक जिव्हाळ्याचा जीव नाहींसा झालेला आहे. पानपतच्या लढाईनें तर महाराष्ट्रावर असा आकांत उडवून दिला होता कीं, त्यावेळीं सुतक नाहीं असे एकहि घर नव्हतें. सवाई माधवरावांनी कारंज्यावर उडी घेतली त्यावेळीं अखिल महाराष्ट्रांत असा एकहि सहृदय जीव नव्हता कीं त्याच्या डोळ्यांत टचकन् पाणी आले नाहीं. संभाजी-महाराजांनी धर्माकरितां डोळे फोडून घेतले, देह सोलून घेतला, त्यावेळीं ह्या महाराष्ट्रांत एक पाषाणहि असा कीं तो घटकाभर रडून घेण्याचा अधिकार प्राप्त व्हावा म्हणून मनुष्य-प्राणी बनला नाहीं, आणि ज्यावेळीं ते आबासाहेब महाराज—मुलांनों, तुम्हाला आबासाहेब महाराज कोण ? ह्याचा नीट अर्थ कळला असेल नाहीं ? पण हा तुमच्या अस्वाभाविक, निसर्ग विरुद्ध, नीतिप्रतिषिद्ध शिक्षणाचा दोष आहे, तुमचा दोष नव्हे. तुमचे शिक्षक लोकमान्यांच्या दहाव्या दिवशीं शाळांचीं द्वारें उघडीं ठेवण्यांत पटाईत आहेत, पण आबासाहेब कोण हें सांगण्यास मात्र ते तयार नाहींत. मुलानों, आबासाहेब महाराज म्हणजे ते सूर्यवंशमणि शिवाजी राजे, आबासाहेब महाराज म्हणजे तो जिजाईचा ताना, तानाजीचा पाठीराखा, स्वधर्माचा वाली, सत्याचा कुलदीप आणि महाराष्ट्र इति-हासाचा कथाकंठमणि, अतुल विक्रमशाली हिंदुपदपादशहा श्री शिवछत्रपति आणि ज्या वेळीं ते आबासाहेब महाराज स्वर्गस्थ झाले त्यावेळीं गहूं हरभऱ्याच्या, बाजरी ज्वारीच्या, तुरी मुइमुगाच्या, साळीतांदुळांच्या ह्या महा-राष्ट्रभूमीवर अश्रूंचा एवढा पाऊस पडला कीं सतसमुद्र ह्या देशावर वाहत गेले असते तरी ह्या भूमीला इतका खारपणा आला नसता.

## गडकऱ्यांना परत बोलवा

कर्ण पतन पावल्यानंतर त्याचा रथ ज्यावेळीं शल्यानें सुयोधनाच्या शिबिरांत नेला, त्यावेळीं रथ रिकामा पाहून सुयो-धनाच्या हृदयांत काय कालवाकालव झाली असेल ? सकाळीं जोमानें चक्रव्यूहांत शिरलेला अभिमन्यु रणांगणावर पडला, असें ऐकून पार्थाच्या अंतःकरणाचें काय झालें असेल ? जीवांत गोवलेला, प्रेमांत शिवलेला, मनांत भावलेला, प्रीतींत खोंवलेला अशा त्या सांवळ्यागोवळ्याला—त्या मधुर मुरलीवाल्याला त्या कुंजविहारी लाडक्याला—त्या राधिकेच्या गोडक्याला-त्या राधिकेच्या खेळगड्याला—त्या यशोदेच्या बाळक्याला-त्या श्रीकृष्णाला-मातृस्तनापासून तों चंद्रकळीपर्यंत सर्व काळ—सर्व वेळ, सर्व चिमुकलें आयुष्य, सर्वांना वेड लावणाऱ्या त्या नंद किशोराला ज्यावेळीं अक्रूरानें गोकुळांतून उचलून नेलें असेल, त्यावेळीं गोकुळांत ती काळ-रात्र कशी गेली असेल ? देशबंधूनों, लोक-

मान्यांच्या विरहाचें दुःख आम्ही कोणत्या शब्दांत, कोणत्या उदाहरणांत वर्णन करूं? खरोखर हें वर्णन करायला आमचेजवळ शब्द नाहींत, हें वर्णन करायला, लोकमान्यांच्याहि अगोदर स्वर्गात पळून गेलेल्या त्या महाराष्ट्रशाहीराला-त्या गडकऱ्याला-परत बोलवा. त्याला सांगा कीं, लोकमान्यांच्या विरहाचें वर्णन करावें लागेल म्हणून त्यांच्याहि अगोदर पळून गेलास काय? चल ये, महाराष्ट्रशाहीर ही आपली पदवी तुला कायम ठेवायची असेल, तर लोकमान्यांच्या स्वर्गवासानें ही महाराष्ट्रभू कशी चर्रर्र झाली ह्याचें वर्णन कर. पण तूं तरी नवीन वर्णन काय करणार? तूं तरी अग्नेल म्हणणार कीं नाहीं, कीं श्री शिवछत्रपतींच्या दिवंगमनानें शोकाकुल झालेल्या महाराष्ट्र भूमीनें मोठ्या आशेनें आपल्या मांडीवर खेळ खेळण्याकरितां घेतलेला हा बाळ ज्यावेळीं मोहमयीच्या दर्याकिनाऱ्यावर अचेतन होऊन पडला, तेव्हां त्या दुर्वार्तेवर विश्वास ठेवायला ती नाकबूल झाली, अग्नीच्या स्वाधीन ती त्याचा देह करीना, अग्नीनें आपल्या ज्वाळा पेटवाव्या आणि महाराष्ट्र-विभवश्रीनें आपल्या डोळ्यांतल्या जलधारांनीं त्या विझवाव्या असा क्रम सुरूं झाला. शेवटीं बेफाम होऊन, केश मोकळे सोडून, खदिरांगारासारखे लाल डोळे करून, ती नीच अग्नीला म्हणाली, 'नीचा, नराधमा, राक्षसा, दूर हो; दूर हो, माझ्या बाळाला स्पर्श करूं नकोस! मेल्या हा अचेतन झालेला नाहीं. माझा राजहंस निजला आहे. त्याला हात तर लाव, म्हणजे ह्या मेघमालेची फुटकी तपेली करून, मी ती तुझ्या डोक्यांत घालीन!'

आणि खरोखर त्यादिवशीं मेघमंडळाची फुटकी तपेली झाली. सरदारगृहांतून लोकमान्यांचा पवित्र देह वाजतगाजत व निशाणें-पताका फडकावीत समुद्रकिनाऱ्याकडे येत असतां त्यादिवशीं पावसाची अशी झुंबड उडाली कीं बोलायची सोय नाहीं. मुंबईत त्या पांचसहा तासांत सपाटूनच पाऊस पडला. निदान त्या दिवसापासून आतापर्यंत (१५-८-१९२०) तरी इतक्या जोराचा पाऊस पडलेला आम्हांला आठवत नाहीं. ह्या पावसाखालीं नर-नारी, बालकें सर्व भिजलीं. ह्या पावसाखालीं अश्व-गोधन पाडसें, सर्व भिजलीं. पण त्या भिजण्याबद्दल कुणास राग आला नाहीं, कीं कोणाला आश्चर्य वाटलें नाहीं. पावसाच्या इतक्याहि झुंबडीमधून सर्वांनी आपली दीन झालेलीं तोंडें वर काढलीं आणि लोकमान्यांच्या देहाचें डोळाभर दर्शनसुख घेतलें. त्यादिवसाच्या पावसाला आमचेजवळ एकच उपमा, म्हणजे ज्यादिवशीं मथुरेच्या तुरुंगांतून गोकुळच्या राजवाड्यांत आपल्या नूतन जन्म पावलेल्या बालकाला वसुदेव रात्रीच्या निबिड अंधकारांतून नेत होता ती होय, परंतु हाय, हाय! त्या रात्रीं एक गीतारहस्य-बोधक बालक जगाला भाग्यशाली करण्याकरतां जन्माला येत होतें. आणि त्या रात्रीं एक गीतारहस्यबोधक बाळ जगाला दुर्भाग्यांत लोटून स्वर्गाकडे कूच करीत होतें.

त्या दिवशीं इतका पाऊस कां पडला? कां पडला ह्याचें काय कारण होतें बरें? लोकमान्यांच्या चितेनें पेट घेऊं नये म्हणून भूमातेनें खरोखरीच का मेघमंडळाची फुटकी तपेली बनविली होती? कीं लोकमान्य स्वर्गाच्या दारांत प्रवेश करीत असतांना स्वर्गातील सुरसुंदरी, अमृताचे कलश त्यांचे पायावर ओतींत होती? कीं गडकरी, केशवसुत, खिस्तप्रेमी टिळक, ह्या कवींचा तांडा स्वर्गदारापाशीं लोकमान्यांचे स्वागतार्थ काव्यरसाचा पर्जन्य पाडीत होता? कीं स्वर्गीय आनंदाश्रमांत बसलेले कै. हरिभाऊ आपटे हे लोकमान्यावर 'तुटलेला ताग' ही आपली नूतन कादंबरी लिहीत असतांना त्या त्या करुण प्रसंगामुळें त्यांची शब्दसुधेनें भरलेली दौत स्वर्गात पालथी झाली होती? कीं लोकमान्य येतात, पंचवीस वर्षांनीं आपल्याला भेटतात म्हणून विष्णुशास्त्री चिपळूणकर, गोपाळराव आगरकर, माधवराव नामजोशी, हे त्यांचे स्वर्गीय मित्र काय आनंदानें डबडबले होते? कीं भूमातेच्या मांडीवरून त्यांना आपल्या मांडीवर घेणारी अमरपुरी त्यांना पहिल्याच दिवशीं लाडानें न्हाऊं माखूं घालीत होती? काय होत होतें सांगा. महाराष्ट्र बंधूनों, काय होत होतें सांगा महाराष्ट्रीय लेखन कुशलानों काय होत होतें सांगा! महाराष्ट्र कविगणानों! आपल्या कल्पनाशक्तींत वाटेल तितक्या कसोटीला लावा आणि लोकमान्यांच्या स्वर्गवासाने दिवशीं असा धो धो पाऊस पडत होता ह्याचें कारण सांगा!

तो प्रसंग आमचे डोळ्यांपुढें अजून चित्रासारखा उभा आहे. इतके दिवस झाले, तरी तो प्रसंग आमचे डोळ्यांपुढून अजून हालत नाहीं. आमचे डोळ्यांत डोळेपणा आहे, आमच्या मनांत मनपणा आहे आमची पर्णकुटी शीतोष्ण स्पर्शांना जबाब द्यायला तयार आहे तोपर्यंत तो प्रसंग आमचें डोळ्यांपुढून कधींहि हालणार नाहीं. लोकमान्यांचा देह, चौपाटी-लगतच्या पुलाला वळसा घालीत होता, पुढें दिंड्या चाललेल्या होत्या, निशाणें फडफडत होती, भजनी मेळे गात होते, परमेश्वराच्या गर्जनेचा गंभीर ध्वनि चोहोंकडे उसळत होता, 'लोकमान्य टिळकमहाराजकी जय' अशा ललकाऱ्या त्या गंभीर ध्वनींत मिसळत होत्या आणि इकडे पाऊस तर असा पडत होता कीं जणुं कांहीं आकाशाची शिवणच उसवलेली आहे. अशा वेळीं काय होत होतें? जो तो आपली मान उंचावीत होता. जो तो पुढें येण्याची खटपट करीत होता, जो तो








धक्के खात होता व देत होता, लहान मुलें सूर्यमंडळासारखीं आपलीं लहानशीं तोंडें घेऊन आपल्यालाहि पहायला सांपडेल काय! म्हणून आशेनें गर्दीत शिरतच होतीं. कित्येक दयाळू माणसें त्यांना आपल्या खांद्यावर घेऊन त्यांची लालसा पूर्ण करीत होतीं. 'हिंदु-मुसलमान! टोपी निकालो,' असें व्हालंटियर लोकांचे हुकूम गर्जतच होते. अशा वेळीं, अशा ह्या संस्मरणीय वेळीं एक सुमारें पस्तीस चाळीस वर्षांचा तरुण ख्रिस्ती मनुष्य, साठ वर्षें वयाच्या आपल्या आईला घेऊन तेथें आला होता. त्याचें अंतःकरण आज एका पवित्र विचारानें भरलेलें दिसत होतें. जवळ उभे असलेले मुसलमान, मागेंपुढें खेचलेले व रचलेले हिंदू आणि पारशी ह्यांचा प्रचंड जमाव पाहून आपण आपल्या कर्तव्याला चुकलों नाहीं, अशाबद्दल त्यांच्या मनाला समाधान वाटत होतें. इतक्यांत पावसाची मुसळधार आली. त्याची ती वृद्ध आई गोंधळली. तिच्या वृद्ध देहाला पावसाचा प्रचंड मारा पीडा देऊं लागला. इकडे टिळकांना मिरवीत मिरवीत हळुहळू येत असलेला देह, आणि इकडे आपल्या म्हाताऱ्या आईची पावसानें उडत असलेली दुर्दशा पाहून, तो ख्रिस्ती मनुष्य हळूच तिला म्हणाला, 'आई, घाबरूं नकोस वरें. हे पहा टिळकांकरितां देवसुद्धां रडत आहेत.' (मा, लुक हियर, ईव्हन गॉड इज वीपिंग फॉर मि. टिळक.)

खरोखर ह्यापेक्षां अधीक हृदयस्पर्शी असें दुसरें कांहींतरी असेल काय? 'मा, ईव्हन गॉड इज वीपिंग फॉर मि. टिळक' ह्यापेक्षां विरहव्यथेचें हृदयस्पर्शी वर्णन कोणाला तरी करतां येईल काय? खरोखर लोकमान्यांचा विरह वाटून परमेश्वरसुद्धां त्या दिवशीं रडला. हिंदुस्थानांत चाळीस वर्षें लोकमान्यांना एकसारखें पहाण्याची संवय झालेला तो परमेश्वर त्या दिवशीं त्यांच्या विरहानें रडला. महाराष्ट्र आणि लोकमान्य ते अलग अलग आहेत असें पहाण्याची कधींहि आपत्ती न आलेला परमेश्वर त्या दिवशीं लोकमान्यांच्या विरहामुळें रडला, आपणांप्रमाणेंच लोकमान्यहि सर्वव्यापि आहेत, निदान महाराष्ट्रदेशावरी त्यांनीं आपल्याप्रमाणेंच सर्वतोव्यास करून टाकलेला आहे असें पाहून 'शिष्यादिच्छेत् पराजयं' या न्यायानें माना डोलवणारा परमेश्वर त्या दिवशीं लोकमान्यांच्या विरहानें धाय मोकलून रडला. कृतांतानें आपल्याला फसविलें, लोकमान्यांच्या वर्दी त्यानें आपल्याला दिली नाहीं, ह्या विचारानें क्रोधायमान झालेला परमेश्वर त्या दिवशीं लोकमान्यांच्या विरहानें रडला. लोकमान्यांच्या दुखण्यांत नवव्या दिवसानंतर त्यांच्या निर्याणाचा हुकूम फिरीव अशी आज्ञा केली असतांहि, रात्रीं चोरट्याप्रमाणें त्या हुकुमाची तामिली करणारा वेशिस्त यमधर्म आमच्यापुढें आणून हाजीर करावा असा विचार मनांत आणणारा परमेश्वर त्या दिवशीं लोकमान्यांच्या विरहामुळें रडला. अन्यायाचा प्रतिकर्ता कोणी उरला नाहीं, ह्या विचारानें त्या दिवशीं परमेश्वर रडला. 'अद्य गंता नीराधारा, निरालंबा तथा मही' असा दुःखाचा विचार मनांत येऊन भगवद्गीतेची निराश्रय स्थिती, जनतेची असहाय अवस्था, आणि महाराष्ट्रभूची वलावलहरी डोळ्यांपुढें ढळढळीत दिसायला लागून त्या दिवशीं परमेश्वर रडला.

—कै. अच्युत बळवंत कोल्हटकर

● ●



## महाराष्ट्रीय अंतःकरणांतून सर्व एक आहेत !

देशभक्त नामदार गोखले जेव्हां वारले तेव्हां ती बातमी (सावरकर) संध्याकाळीं जेवत असतां जेलरसाहेबांनीं कारागृहांत येऊन मला सांगितली. (Well you always want news, Mr. Sawarkar, here is something for you, Gokhale is dead!) सावरकर, तुम्हांला नेहमीं बातमी हवी असते नाहीं? ही घ्या बातमी. गोखले वारले.

मला क्षणभर तें खरें वाटेना. इतकी अकल्पित ती बातमी होती. मी दुःखोद्गार काढलेले पाहून जेलर म्हणाले, "पण ते तुमच्या विरुद्ध होते ना?" मी म्हटलें, "छे छे! त्यांच्याच महाविद्यालयांत शिक्षण घेतले आहे. मतभेद असेल, विरोध नव्हे. ते आमच्या हिंदुस्थानांतील ह्या पिढींतीले एक निस्सीम देशभक्त आणि देशसेवक होऊन गेले." पण जेलर म्हणाले, "तुमच्या खटल्यांत त्यांच्याविरुद्ध तुम्हीं भयंकर कट केल्याचा पुरावा आलेला होता तो? आणि तुम्हांस धरल्याविना हिंदुस्थानांत शांति प्रस्थापित होणार नाहीं, असें ते म्हणाले होते ना?" मी उत्तरलों, "त्याविषयीं दंतकथांवर विश्वास ठेवण्यांत अर्थ नाहीं. त्यांचीं माझीं प्रत्यक्ष संभाषणें झालीं आहेत. आणि आम्हां दोघांविषयीं परस्पर दोघांसहि अत्यंत पूज्यबुद्धि वाटत असे, हें त्या भाषणाचे वेळीं उपस्थित असलेल्या गृहस्थांस माहित आहे. त्यांस देशहिताचे दृष्टीनें माझा मार्ग क्वचित मान्य नसेल; पण म्हणून त्यांच्या देशभक्तीची थोरवी लेशमात्र उणी होत नाहीं. आणि कटाविषयीं विचाराल तर इंग्लंडमध्यें त्यांच्या एकदोन विरुद्ध भाषणांनीं प्रक्षुब्ध होऊन जेव्हां अभिनव भारतांतील कांहीं पुढारी त्यांच्यावर आक्रमण करण्याच्या गोष्टी गुप्त बैठकींत बोलले तेव्हां त्या अमंगल विचारांचा तीव्र निषेध करून प्रामाणिक मतभिन्नतेसाठीं कोणावरहि आक्रमण करणें आणि तेंहि स्वजनांवर करणें हें घोर पातक आहे. हा खराखरा अत्याचार होईल हें मी त्यांस समजाऊन दिलें. आणि तो ठराव सम्मत होऊं दिला नाहीं, ही गोष्ट ते स्वतःच सांगतील. जर प्रत्येक हिंदू गोखल्यांइतका जरी देशभक्त आणि देशसेवक होईल तरीहि...!!" आमचे हे संभाषण जेलरसाहेबांनीं यथाक्रम टिपून ठेवलें होतें. कांहीं काळानें मला एकदां तें टिप्पण पहावयास मिळालें. त्यांत जेलरसाहेबांनी साश्चर्य एक विधान केलें होतें—आणि हेंच विधान ते इतरत्रहि करीत कीं, 'वर वर कितीहि भिन्न आणि विरोधी दिसलें तरी हे महाराष्ट्रीय अंतःकरणांतून सर्व एक आहेत !'

('माझी जन्मठेप' स्वातंत्र्यवीर वि. दा. सावरकर)

अनुक्रमणिका







राधाबाईंच्या डोळ्यांसमोर तसाच अंधार होता. त्या अंधाराला भोंक पडलें होतें. त्या भोंकांतून गुंजेसारख्या लाल बटबटींत डोळ्यांचीं एक घूस पुढें सरकत होती.

# ग्र ★ ह ★ ण ★

अधंवट झोपेंतून अचानक जाग आल्याप्रमाणें राधाबाईनीं डोळे उघडले. एकादें वाईट स्वप्न पडलें असावें. अंगाला घाम फुटला होता. आपली कोरडी जीभ वाळलेल्या ओंठावरून त्यानीं एकदां फिरवून पाहिली. तहान लागली होती. परंतु उठावंसं वाटत नव्हतं. अंथरुणाला अंग चिकटलं होतं झोपल्या ठिकाणाहूनच त्यानीं खोलीवर नजर फिरविली.

नुकतंच तांबडं फुटूं लागलं होतं. खिडक्यांना लावलेल्या हिरव्या पडद्यांतून आंत येण्याकरितां बाहेरचा प्रकाश धडपडत होता आणि खोलींतला जांभळी अंधार त्याला घाबरून मागें सरकत होता. चोरासारखा कोपऱ्यांत पडून बसत होता. राधाबाई डोळे फाडून त्या अंधाराकडे बघत राहिल्या. कोपऱ्याशी भिंतीला तडा गेला होता. त्याच्या वळाशीं एक भलं मोठं भगदाड पडलं होतं. काळोखाचं जणुं बर्फ झालं होतं त्या ठिकाणीं. त्या भगदाडांतून एक घूस आपलं डोकं बाहेर काढायचा प्रयत्न करीत होती. इवलेसे ताठ कान. गुंजेसारखे लाल बटबटीत डोळे. आपलं जाड घाणेरडं अंग घुसळीत बाहेर येण्याचा आटोकाट प्रयत्न चालविला होता तिनें.

घाबरलेल्या नजरेनें राधाबाई तिच्याकडे पाहात राहिल्या. ऊर जोरानं धडधडूं लागला. त्या लाल डोळ्यांतील अंगार आपल्याला भाजून काढतो आहे असं त्यांना वाटूं लागलं. आपल्यावर झेप टाकायचा तर विचार नसेल तिचा ? अरे बापरे; किती भयानक होतं ते दृश्य !

राधाबाईंना गळल्यागत झालं. नाडीचे ठोके जलद पडूं लागले. गप्कन् त्यांनी आपले डोळे मिटून घेतले. पुनः डोळे उघडल्यावेळीं मात्र तिथें कांहींच नव्हतं. कोपऱ्यांतला काळोखहि वितळला होता. अरूणचं एक खेळणं मात्र त्या कोपऱ्यांत पडून राहिलं होतं; इतकंच.

राधाबाईंना नवल वाटले. म्हणजे याचा अर्थ काय ? आपल्याला नुसता भासच झाला कीं काय ? छे; किती भ्यालों आपण. सकाळच्या या शुभप्रहरीं अपशकुन झाला म्हणायचा. त्यांना कांहीतरी चुकल्यागत वाटूं लागले. खोल खोल मनांत एक अस्पष्ट चीत्कार उमटला आणि आंतल्या आंत घुमत घुमत विरून गेला.

पांघरलेली चादर दूर सारून त्या पलंगावर उठून बसल्या. पलीकडच्या टेबलावर औषधांच्या बाटल्या, इंजेक्शन् ट्यूब्स् आणि एक औषधाचा ग्लास गुपचूप पडून होते. बाजूच्या घड्याळाची कटकट मात्र तशीच चालू होती. औषधांचा दर्प अजून खोलींत दरवळत होता.

• • •

शेजारच्या खोलीचे दार अर्धे उघडे होते. मधल्या फटींतून त्या







खोलींतला प्रकाश आंत येत होता. स्टोव्हचा आवाजहि ऐकूं येत होता. त्यांतच - भांड्यांचा खणखणाट आणि बांगड्यांचा किणकिणाट मिसळला होता.

## आनंद वर्टी

शालिनीनें चहाची तयारी चालवलेली दिसतेय्. खरंच, किती गुणी पोर आहे. इतक्या लवकर उठून शांतारामसाठीं चहाची तयारी करतेय् हो; जेवणहि तयार झालं पाहिजे ना. साडेआठला तर शांताराम निघतो ऑफीसला. सगळं कांहीं लवकर आटपलं पाहिजे. शालिनीलाच सगळं करावं लागतंय्, मी करतें मदत शक्यतेवढी; परंतु तिच्यावरच भार पडतोय् संसाराचा.

दार उघडून राधाबाई सैंपाकघरांत आल्या. स्टोव्हवर ठेवलेल्या पातेल्यांत शालिनी चहाची पावडर ओतीत होती. उघडलेली विळी तशीच उघडी होती. तिच्यापुढें भाजीनें भरलेली टोपली होती. भाजी चिरीत होती वाटतं, शालिनी.

राधाबाई आंत आलेल्या शालिनीला समजलं. वळून तिनें त्यांच्याकडे पाहिलं. परंतु राधाबाईंना रोजचा प्रसन्न चेहरा दिसला नाहीं. काळजीचे ढग तिथें जमा झाले होते. मनावर पडलेल्या कसल्याशा दडपणाचे प्रतिबिंब तिच्या नजरेंत दिसत होते.

"शांताराम उठला का ग?"

"हो, बाहेर बसले आहेत पेपर वाचत."

"आज का लवकर उठला?"

"झोप लागली नाहीं म्हणे."

"तूं पण."

"हं."

"शालिनी; बरं नाहीं का वाटत?"

"का? ठीक आहे नी."

कोमेजलेल्या चेहऱ्यावर बळेच हसूं आणून शालिनी म्हणाली.

"दमल्यासारखी वाटतेस फार."

"छे;" कपाळावर रुळणारी केसाची बट मागे सारीत ती म्हणाली, "न विंचरल्यामुळें दिसत असेन."

स्टोव्हवरचं पातेलं शालिनीनें खालीं उतरविलं.

"राधाबाई विळीवर बसल्या. भाजीची टोपली त्यांनीं जवळ ओढली. मुठींत मावेल एवढी भाजी उचलून त्यानीं ती नीट लावून घेतली आणि मग त्या भाजी चिरूं लागल्या. शालिनी त्यांच्याकडेच पाहात होती. लगेच म्हणाली,

"नको, नको; ठेवून द्या, मी चिरीन भाजी."

तिचा आवाज किंचित् कांपरा झालेला होता.

"कशाला? मी करतें आहे ना. तूं चहाचं बघ तेवढं; शांताराम बाहेर वाट पहात असेल."

शालिनी गोंधळली. काय बोलावें तिला सुचलें नाहीं. अनामिक भीतीची छटा तिच्या चेहेऱ्यावरून चमकून गेली. बोलण्यासाठीं तिची जीभ चुटपुटूं लागली; परंतु तिला कुणीतरी खेचून धरल्यासारखे तिला वाटलें. डोळ्यासमोर कुणीतरी घसरून पडत असतां; आपल्याला नुसतं त्याच्याकडे बघत राहण्याशिवाय कांहींहि करतां येऊं नये. अशावेळीं मनाची किती घालमेल होते. शालिनीला तसंच कांहींसं वाटलं. तिच्या मनांत विचारांचं काहूर उठलं.

चहांत दूध ओतण्याकरितां उचललेलं भांडं लगेच खाली ठेऊन लगबगीनें ती राधाबाईंजवळ आली.

"अहो अजून कितीतरी अवकाश आहे. मी करतें सगळं. तुम्हीं बाहेर पलंगावर स्वस्थ पडून राहलं तर नाहीं का होत?"

बोलतांना शालिनीला किती कष्ट पडत होते हे तिच्या चेहऱ्यावरून लगेच समजून आले असते. तिरस्काराची पुसटशी छटाहि तिथें उमटली होती.

"एवढा का उत्साह उतूं चाललाय्?" राधाबाईंनाहि आतां रागावावंसं वाटूं लागलं.

"उत्साह कुठला आलाय्? तुम्हांलाच त्रास होईल म्हणून म्हणतेय्. आंत आजून शांत झोपा पाहूं."

राधाबाईंच्या हातांतली भाजीची जुडी हिसकावून घेत शालिनी म्हणाली.

राधाबाईंना आतां विळीवरून उठावंच लागलं. आज आपली सून अशी कां वागतेय् हें राधाबाईंनां समजेनासं झालं होतं. आपण भाजी चिरायला बसलों तर तिनें आपल्याला कधींहि हरकत घेतली नव्हती. मग आजच अशी कां वागतेय् ही. हातांतली भाजी हिसकावून घेण्यापर्यंत मजल गेली अं!



राधाबाईंचा राग वाढूं लागला. आपल्या सुनेला मदत करायची तिची मनापासून इच्छा होती. आपल्या मुलाच्या संसाराला आपला हातभार लागावा हीच तर त्यांची आकांक्षा होती. खरं सांगायचं म्हणजे घरीं आलेल्या सुनेला त्या कांहीं काम पडूं देणार नव्हत्या. कॉलेजमध्यें शिकलेली मुलगी होती शालिनी. थोरामोठ्यांच्या घरची लाडात वाढलेली. अंगानें नाजूक. तिला का सगळे घरकाम करायला सांगणार ? परंतु राधाबाईंचे मनोरथ पूर्ण झाले नाहींत. शांतारामचे लग्न झालं आणि त्या आजारी पडल्या. दिवेलागणीच्या सुमारास बारीक ताप यायचा. दिवसभर दमल्यासारखे वाटायचें. अलीकडे खोकलाहि मागें लागला होता. तरीहि राधाबाईंना अंथरुणांत पडून राहाणें जमत नसे. कामाशिवाय त्यांनां करमत नसे. जुनं हाड होतं ते.

कोपऱ्यांतल्या विरजणाच्या बरणीकडे जात त्या म्हणाल्या, "थांब; मी ताक तरी घुसळून ठेवत्यें."

शालिनीचं उत्तर येण्यापूर्वीच त्यांनीं खांबाला बांधून ठेवलेली दोरी सोडून रवोला गुंडाळायला सुरुवात केली.

शालिनी कांहींच बोलली नाहीं. हातांतली भाजी टोपलींत ठेवून राधाबाईकडे नापसंतीचा कटाक्ष फेंकून ती कपांत चहा ओतण्याकरितां निघाली.

राधाबाईंचे हात ताक घुसळीत होते; मनांतहि विचारांची घुसळण चालली होती. शालिनीची वागणूक म्हणजे मोठं कोडं वाटत होतं त्यांना. चहा घेवून बाहेर गेलेली शालिनी किती तरी वेळ बाहेरच उभी होती. राधाबाईंनीं कान टवकारले. बाहेर दोघांची खलबतं चालू होतीं; खालच्या आवाजांत. आपल्याला ऐकूं जाऊं नये, म्हणून असेल का ? हो; नाहींतर का एवढी गुप्तता ? काय झालं आहे आज यांना ? काय सांगायचं आहे मला ?

मध्येंच खोकल्याची उबळ आली आणि राधाबाईंचे विचार तिथेंच थांबले. तो खोकला त्यांना आवरतां आला नाहीं. त्या घाबऱ्या झाल्या. सासूबाई खोकत असल्याचें ऐकून शालिनी पळत आंत आली.

"ठेवा ती दोरी खाली. कां करतां उगाच ? आतां बाहेर जा पाहूं."

"नाहीं ग, नुसता खोकला आला एवढंच. विशेष कांहीं नाहीं. तूं आधण ठेव स्टोव्हवर; मी बसतें इथें."

"नको; उठा, तुम्हीं कांहीं करूं नका. चला, मी एवढी सांगतेय तरी...समजलं पाहिजे माणसाला." शालिनीचा आवाज कठोर झाला होता.

राधाबाईनांहि ते उमजले. शालिनी आपल्यांशीं इतक्या कठोरपणें कधींच वागली नव्हती. आजच असें का ? एकाद्या लहान मुलानें खेळत असतां गमतीनें दिव्याची तापलेली कांच हातांत धरावी तशी राधाबाईंची स्थिति झाली.

हातांतली दोरी खालीं ठेवून त्या उठल्या. मोरीवर जाऊन हात धुतले. आणि न बोलतां त्या सैंपाकघराबाहेर आल्या. मन नको म्हणत असतांना नजर शालिनीच्या नजरेशीं जरा अडखळलीच. शालिनीच्या नजरेंतील एक प्रकारचा भीतीचा भाव तियली अपराधाची जाणीव त्यांच्या नजरेनें टिपून घेतली. आपण बाहेर जात असल्यामुळें तिला वाटणारें समाधानहि राधाबाईंच्या लक्षांत आले.

त्या आतां बाहेरच्या खोलींत आल्या. शांताराम पेपर वाचत आराम खुर्चीवर रेलला होता. बोटांमध्यें धरलेली सिगारेट जळत होती. झुरके घेण्याचेंहि जणुं तो विसरला होता. बाजूच्या टेबलावर रिकामीं कपबशी आणि बिस्किटं ठेवलेली बशी तशीच पडून होती.

राधाबाई आंत आल्या तरी त्यानें पेपर दूर केला नाहीं. न बोलतां तसाच बसून राहिला. राधाबाईंनां हें विचित्र वाटलें रोज आपल्याशीं गप्पा मारीत बसणारा शांताराम आज बोलत कां नाहीं ? तोंडसुद्धां लपवीत आहे. कां हें असे ? आपल्यापासून काय लपवीत आहेत ही माणसें ?

"शांताराम"

"हूं"

"बिस्कीट खाल्लं नाहींस का रे ?"

"अं हूं." पेपर न सारतां शांताराम म्हणाला.

"आज ग्रहण आहे ना ? लवकर जेवण झालं पाहिजे."

"हूं."

"ऑफिसला सुटी नाहीं का आज ?"

"छेः आम्हांला कुठें आलीय सुटी ?"

संपत आलेल्या सिगारेटीचा चटका जाणवल्यामुळें शांतारामनें ती ॲशट्रेमध्यें फेकून दिली. पुनः मौन राधाबाईंनां सहन झालें नाहीं. आपल्याला मुद्दामच ही दोघं टाळताहेत असं त्यांनां वाटूं लागलं. काय करावं त्यांना सुचेनासं झालं. गुदमरल्यासारखं वाटूं लागलं.

"आजीऽऽ"

अरुण उठला होता. त्याची ती हांक ऐकून राधाबाईंना कांहींतरी गवसल्यासारखें वाटलें.

"अरू; बाळ उठलास का ?"

राधाबाई आंतल्या खोलींत आल्या. नुकताच उठलेला अरुण खाली उतरण्याचा प्रयत्न करीत होता.

"एऽ गुलामा; पडशील ना. थांब थांब." म्हणून धांवतच त्या त्याच्याकडे गेल्या आणि त्यांनी अरूणला उचलून घेतले. झोपल्यामुळें विस्कटलेले त्याचे केस कुरळेपणामुळें ज्यास्तच छान दिसत होते. त्याच्या लालचुटुक ओठांवरचें हसूं तर नेहमीच फुललेले असायचे.

"आजी, आज ग्रहण नाहीं का ?"

एकदम आठवल्याप्रमाणें अरूणनें विचारले.

"हो; म्हणूनच तूं लवकर दूध पिऊन घे हं."

"आजी, ग्रहण म्हणजे काय ग ?"

"ग्रहण म्हणजे...सूर्य आहे ना त्याला गिळून टाकतो राक्षस."

"राक्षस !" अरूणच्या डोळ्यांत आश्चर्य भरले होते.

"मला दाखवशील का आजी ?"









" हो; आधी तूं तोंड धुवून घे बरं का. "

अरूणला उचलून राधाबाई वॉश वेसिन्‌कडे आल्या. ब्रशला टूथ्‌पेस्ट लावून हलक्या हातानीं त्या अरूणचे दांत घासूं लागल्या.

त्याचें तोंड धुवून त्यांनी टॉवेलनें पुसलें.

" आजी. "

" काय ? "

" एक चॉकलेट. "

" सकाळींच चॉकलेट. "

" आजी. "

अरूणचा तो आर्जस्वी स्वर ऐकून राधाबाईंना हसूं आवरलें नाहीं.

" बरं, बरं, देते हं चॉकलेट. परंतु मला काय देणार आहेस तूं ? एक गोड गोड पापा देशील का ? "

अरुण खुदकन् हंसला.

त्याच्या बाळसेदार मुखावरचे तें प्रफुल्लित हसूं पाहून राधाबाईंना उचंबळून आलें. आपल्या दोन्ही हातांत त्याला कवटाळून त्यांनीं त्याच्या ओठांचे हळुवारपणें चुंबन घेतलें. अरुणनेंहि आपल्या इवल्या हाताची माळ आजीच्या गळ्याभोंवती गुंफली होती.

" अरू, चल आतां, चॉकलेट देतें हं. " म्हणून त्या अरुणला उचलून घेऊन आंत जायला निघाल्या. दरवाज्यात शालिनी उभी होती. डाव्या हातानें तिनें पडदा सरकविला होता. तीच नजर ! तीच विचित्र नजर ! संशयानें भरलेली घाबरट नजर. तीच गंभीर मुद्रा. ती नजर बघतांच राधाबाईंच्या छातींत कळ उठली.

" अरू उतर खालीं. " शालिनीचा स्वर कठोर झाला होता.

" मी नाहीं जा. "

" अरू. "

शालिनी पुढें झाली. दोन्ही हात पसरून तिनें म्हटलें,

" अरू बाळ, शहाणा तो, दूध पिणार ना. "



" अंहं; मला चॉकलेट पाहिजे. "

" मी देतें हं चॉकलेट, माझ्याकडे ये बरं. "

" अंहं; नक्को; आजीनें दिलं पाहिजे. "

आजीभोंवतीं अरूणची मिठी ज्यास्तच घट्ट झालीं. शालिनी गोंधळली. परंतु लगेच तिनें स्वतःला सावरलं. मन घट्ट केलं; आणि अरुणला जवळजवळ बळबरीनें आजीपासून ओढून घेतलं.

" उशीर झाला बघ, सोड त्यांना. "

शालिनीचा आवाज ज्यास्तच कठोर झाला होता. राधाबाईंना त्याची झळ जाणवली. तिचे हात आपोआप सैल पडले.

आजीनें आपल्याला सोडलेला पाहातांच अरुण ओरडला, "आजी, ए ऽ आजी ऽ "

परंतु शालिनी परत फिरली नाहीं. लगबगीनें ती आंत निघून गेली.

राधाबाई जागच्या जागीं खिळून राहिल्या. आपल्या नातवाला आपल्यापासून हिरावून घेतलेलं तिच्या मनाला फार लागून राहिलं. कां उचलूं नये आपण त्याला ? कां खेळवूं नये ? कां घेऊं नये पापा त्याचा ? नातू नाहीं का तो माझा ? मग शालिनी अशी का वागते आहे ? तिची ती नजर अशी आपल्याला का टोंचते आहे ?

राधाबाईंच्या मनांत घालमेल सुरू झाली. सरळ बाहेरच्या खोलींत जावं आणि शांतारामला याचं स्पष्टीकरण विचारावं असं तिला वाटलं. आपल्या घरीं आपला असा अपमान होतो म्हणजे काय ? या घरांत कोणी नाहीं का मी ? परंतु शांतारामच्या त्या घुम्या गंभीरपणाची आठवण झाल्याबरोबर तिनें तो विचार झटकून टाकला.

सैंपाकघरांतून कुजबुज ऐकूं येत होती. खालच्या आवाजांत शालिनी सांगत होती,

" अरू; आजीकडे जाऊं नये बरं का, त्यांनीं दिलेलं कांहीं खावूं नये. "

" अंहं, मी जाणार जा. काय करणार आहेस तूं ? कां जाऊं नये ? आजी मला आवडते. "

" सांगितलेलं ऐकलं पाहिजे मुलांनीं. जास्त बोलूं नये. "

" मी जाणार, जाणार, जाणार. "

" पप्पानां सांगेन. "

" सांग. "

" मार देईन बघ. "

राधाबाईंनां पुढें ऐकावंसं वाटलं नाहीं. कानावर हात ठेवून त्या आपल्या खोलीशी आल्या. आंत जाऊन पलंगावर त्यांनीं स्वतःला झोकून घेतले.

फारच थकवा वाटत होता. असहायतेच्या भावनेनें त्यांना पछाडले होते. आपल्या मुलाची व सुनेची वागणूक त्यांना मोठं कोडं वाटूं लागलं होतं. आपल्याविरुद्ध यांनीं कुट केला असावा असं त्यांना वाटूं लागलं. आपल्या जीवनांतल्या आनंदाला झपाट्यानें ओहोटी

लागली आहे असं त्यांना वाटूं लागलं. मनांतल्या मनांत राग धुमसूं लागला. शांतारामनें असं वागावं का? भोंवऱ्यांत सांपडलेल्या माणसासारखी त्यांची स्थिती झाली. त्या ज्यास्तच खोलांत जाऊं लागल्या. एकलेपणाची भावना मनावर पसरूं लगली. एकटे आहोंत आतां आपण...एकटे आहोंत...

राधाबाईंचा गळा भरून आला. नकळत एक दृश्य त्यांच्या डोळ्यांपुढून तरळत गेलं. ते मृत्युशय्येवर पडले होते...शेजारी आपण बसलों होतों...शांताराम लहान होता त्यावेळेला...हायस्कूलमध्यें शिकत होता. जड घोगऱ्या आवाजांत त्यानीं सांगितलं होतं, 'तूंच आधार आहेस आतां शांताला...' त्यांनीं डोळे मिटले होते. त्यानंतर आपण कष्टाचे किती डोंगर उपसले. किती यातना सहन केल्या. डोळ्यांच्या कोपऱ्यांत उभ्या राहिलेल्या आंसवांना त्यांनीं बोटानें टिपून घेतले...हा आजार नसता तर...किती सुखी होतों आपण... आपल्या मुलाचा राजाराणींचा संसार आहे. आणि इथें उमललेलं हें हसतमुख फूल...अरुण...हा आजार नसता तर...

राधाबाईंना उगीच कालच्या रात्रीची आठवण झाली. डॉक्टर आले होते काल नेहमीसारखं त्यांना तपासलं होतं. लाल लाल औषध नळींत घेऊन ते सुईनं त्यांच्या अंगांत टोचलं होतं. त्या औषधाचा वास आतांहि त्यांच्या नाकांत दरवळला. कुठलासा फोटो घेऊन आले होते डॉक्टर. शांतारामला बाहेरच्या खोलींत नेऊन त्याला इंग्रजीमध्यें कांहींतरी सांगितलें होतं त्यांनी. आपल्याला कांहीं समजलं नव्हतं; तरी कांहीतरी भयंकर सांगत असावेत असा होता त्यांचा आवाज. शांताराम बोलत नव्हता. होय; शांताराम बोलला नव्हता. अजूनहि बोलत नाहीं. कां? कां असेल?

राधाबाईंना आपल्या छातीवर लाथ मारल्यासारखे वाटले. डोळ्यांसमोर अंधारून आले. कोणतीशी गूढ, अव्यक्त अशी अशुभ शक्ति आपल्यावर चालून येत आहे असं त्यांना वाटलं. गपकन् त्यांनी डोळे मिटून घेतले. परंतु मिटलेल्या डोळ्यांसमोरहि अंधार तसाच होता. त्या अंधाराला भोंक पडलें होते. त्या भोकांतून गुंजेसारख्या लाल-बटबटीत डोळ्यांची एक घूस पुढें सरकत होती. स्वतःच्या दाढेंत आपल्याला रगडून काढण्यां-साठीं. राधाबाईनां ओरडावेसें वाटले. परंतु ओठांतून शब्द फुटला नाहीं, असहायतेनें त्यांनीं दोन्हीं हातानीं उशी गच्च पकडून ठेवली.

बाहेर अंगणांत मुलं खेळत होती. कुणीतरी एकदम ओरडला, 'अरे, ते बघ ग्रहण लागलं' आणि क्षणार्धांत बाकीची मुलंहि ओरडूं लागली, "ए ग्रहण लागलं, ग्रहण लागलं."

• • •



# मुग्ध-मधुसूदन

### तृतीय सर्ग

कंसारि होय संसारी वासनाबंधशृंखला
सोडुनी गोपिका साऱ्या राधिका हृदयीं धरी ॥
मदनबाण व्रण विव्हल माधव भवती शोधुनि शिणला
दिसे न राधा, कालिंदीतटकुंज कोटरीं निजला.

**( प्रबंध ७ वा.** राग : गुर्जरी— एकताल **)**

हरहर गेलि कुठे निधुनी मानिनि मजवरि रुसली राधा,
रमवित रमतां रमणीसंगें मानिनीचा मान भंगे
मी कारण या अपराधा हरहर गेलि कुठे राधा ॥ धृ० ॥

बोलूं कसें, करुं काय भामिनी
चैन नसे ग विजनीं सदनीं
नीज न येई नयनीं शयनी
छळिसि असा प्रारब्धा
हरहर गेलि कुठे राधा ॥ १ ॥

कोपें चढती वरती भिवया
आछवितो गे वदन कुवलया



राजा बढे.

रक्तकमलिं जणुं नील भृंगि ती
भ्रमते मरंदलुब्धा
हरहर गेलि कुठें राधा ॥ २ ॥

वससि सदा हृदयांत कामिनी
वणवण वनिते फिरतो विपिनीं
वेडा तुज धुंडीत कुंजवनिं
तुजवरि प्रीत अगाधा
हरहर गेलि कुठे राधा ॥ ३ ॥

उगाच धरिसी अढी मज गमे
सोडि असूया, येइ प्रियतमे
कुठें कळेना लपलिस सुषमे
क्षमा करी अपराधा
हरहर गेलि कुठे राधा ॥ ४ ॥

भास तुझा मज होय राधिके
दूर उभी कां मनोहारिके
आलिंगुनि तनु प्रीतिचन्द्रिके
एकांती रतिबंधा
हरहर गेलि कुठे राधा ॥ ५ ॥

सखे येउं दे राधे करुणा
मदन छळितसे तुझिया रमणा
साहुं कसे या जिवंत मरणा
निववी अनंगबाधा
हरहर गेलि कुठे राधा ॥ ६ ॥

सिंधुसंभवा चंद्रबिंब कीं
किंदुबिल्व कुलवतंस लोकीं
श्री जयदेव कवीवर गाई
हरिसंकीर्तन छंदा
हर हर गेलि कुठें राधा ॥ ७ ॥

**( प्रबंध ७ वा समाप्त )**

नव्हे भुजंगम मृणालमाला हृदयावरती पाहे
कमलदलांची पडे सावली, गरलकंठ हा नोहे
विरहि प्रियेच्या पांडुरपण ये भस्म नसे रे अंगा
समजुनि शंकर करिसी कोपें प्रहार काय अनंगा ?

* * *

नको रे धरूं कुसुमचापा बाण हा आम्रमंजिरीचा
कांपवी देह टणत्कार; ओढितां कंकर भृंगाचा
सहज घेइ प्राण अनंगा तव शरसंधान
घातकी तुझ्या प्रेमलीला जिंकिती जगास मोहून
विंधिती हरिणींचे डोळे टाकुंनी कटाक्ष मद धुंद
आधिच हृदय भेदलें रे जाहलो सख्या जायचंद
करावी छिन्न भिन्न हृदयें पुन्हा का ती माळायाला
नसे पुरुषार्थ पुष्पधन्व्या, मारिता मज घायाळाला

* * *

कर्णपाळ प्रत्यंचा नयनांचे तीक्ष्ण बाण
खेचताच वक्रगती भिवयांची ती कमान
देवि कामरूपिणीच राधिका, स्वयें तिला
अजिंक्य मन्मथें अमोघ अस्त्रभार अर्पिला

* * *

करि घाय उरीं, सखि सायक तो तुझिया नयनांमधुनी सुटता
भृगुटी थरके, नच नेम हुके तनु कांपतसे धनु वाकविता
मृदु कुंतल गुंतविती ललिते, रति जागविती मनिं आतुरता
रशना मणि मंजुल नादविते कटिकंपित, चेतवि चित्त व्यथा
रतनार तुझ्या अधरा बघुनी नच भान उरे मजसी रसिके
कुचमंडल कंचुकि संचित तें करिती मज वंचित प्राणसखे
सुखसंग समागम स्पर्श तुझा, मति विभ्रम लोचनिं लास्य तसें
रसभाव सुधा मधुराच गिरा मृदुहास्य तुझ्या अधरीं विलसे
वदनांबुज सौरभ तो सुभगे, विषयीं सविकल्प समाधित या
विरही तरिही तुजवीण सये हृदयांतिल दुःख न जाय लया

* * *

किरिट कुंडलें हलति लोल ती अधरीं मंजुल वेणू
किंचित् कलती मान, अंगुली आंदोलित स्वर रेणू
वेणूरवरंजिता वाहते कालिंदी सुखसरिता
गुरलें भान तयास कशाचें गानलुब्ध व्रजवनिता
कुणी न पाही कटाक्षलीला जडता मोहन बाधा
भावमुग्ध मधुचंद्र कौमुदी कामसुंदरा राधा

( ' मुग्ध मधुसूदन ' तृतीय सर्ग समाप्त )

• • •

## चतुर्थ सर्ग

( स्निग्ध–माधव )

यमुनातीरीं नीरवकुंजीं उदास मानस मौनी
भ्रांतचित्त माधवा सांगते राधासखि येवोनी

**( प्रबंध ८ वा**–राग कानडा–एकताल **)**

तुजविण विकल राधिका दीना
हा विरह तिला साहिना ॥
मदनशरें जाहली भयाकुल माधव तवपदलीना ॥ धृ० ॥
निंदित इंदुकिरण, मनविंधित चंदनगंध विषारी
व्यालगरल लहरी अनुमीलित मलयसमीर विहारी
तळमळते ती मीना ॥ १ ॥

हृदयिं वसे व्रिजलाल तयातें ठेवी उरिं लपवोनी
मदनशरांचे घाव चुकविते नलिनिदलें कवळोनी
विरहें म्लानमलीना ॥ २ ॥

कुसुमाकर शरशेज रचे ती विलास केलि कराया
शरतल्पावरि कोमल काया तुजसी आलिंगाया
कंपित आंतरवीणा ॥ ३ ॥

वाहति नयनांतुनी आसवें, भिजति मुखारविंदा
अमृतबिंदू कीं ओघळती राहू गिळिता चंद्रा
झाली रे अतिदीनी ॥ ४ ॥

मदनरूप रेखितें तुझें ती कस्तुरिकेनें श्यामा
पूजि मकर करि चूतमंजिरी देउनिया अभिरामा
रंगली चित्रभावलीना ॥ ५ ॥

' आल्यें आल्यें शरण प्रिया मी तुझिया पदारविंदा
जाळित हा बघ चंद्र उदेला लोटु नको गोविंदा '
जाहली हाय पराधीना ॥ ६ ॥

घडे न भेटी तुझी जाणुनी चिंतनिं होई लीन
हसते रडते चिडते शोकें चित्त शांतवी दीन
राधिका होय भाग्यहीना ॥ ७ ॥

श्री जयदेव रचित मधुरचना रुचेल तुजसी रसिका
हृदयभाव कल्लोल राधिका, सखि सांगे, हरि दुरि का
राहसी रे राधारमणा ॥ ८ ॥

**( प्रबंध ८ वा समाप्त )**

विलास मंदिर तिला माधवा
कानन वन भासतें
उदास मनिं हासतें ॥ माधवा–
सखि सहवासहि होय नकोसा
सदाच टाकित हाय उसासा
श्वासें तनु जाळते ॥ माधवा ॥ १ ॥

लागतांच कीं वणवा विपिनीं
सैरावैरा पळते हरिणी
विरह व्यथित ती दीन विरहिणी
लपावया धावते ॥ माधवा ॥ २ ॥

शार्दुल भासे मदन घन खरा
गिळायास ये तिला श्रीधरा
आठवीत तुज शामसुंदरा
अश्रुमणी गाळते ॥ माधवा ॥ ३ ॥

**प्रबंध ९ वा**

राधिका झुरते, झुरते तुजसाठी
माधवा देई रे भेटी ॥
गळा मणिमाळा स्तनयुगुंआवरती
रुळती श्वासानें झुलते ॥

अनुक्रमणिका






कृशतनू राधा, विरह दुर्निवार
तिला तो सोसवे न भार ॥
विषासम होई, शीत सुगंधाची
उटी लाविली चंदनाची ॥
मदन हा जाळी जाळित जीवास
उष्ण ते सुटती निश्वास ॥
मृणालाविन ती, निळी नेत्रकमळें
भरावी सदाच अश्रुजळें ॥
भिरभिरा पाहे, पाहे भवताली
दिसे कां कोठे वनमाळी ॥
रचावी शय्या मुकुलित कुसुमांची
भासते तिला इंगळाची ॥
सांज ओसरतां चिंति भाविकाल
टेकुनी तळहातीं गाल ॥
कशी बाई ग ! कंठु काळरात !
बैसते सखी विचारात
राधिका माझी अभागिनी पोर
म्लान ती दिसे चंद्रकोर
माधवा येई, येइ देवदेवा
जिवलगा मरण तरी दे वा
विरहिणीराधा धाव अतां धांव
सारखे घेई तुझें नांव
गाई जयदेव नित तुझिया छंदा
राधिका रमणा गोविंदा.

**( प्रबंध ९ वा समाप्त )**

थरथरतें, मनिं झुरते, रातदिनीं तळमळते
तव विरहें रतिरमणा काळिज तिळतिळ जळतें
रोमांचित होय तनू करित सखी हाय हाय
देत हुंदके रडते मोकलुनी धाय धाय
उठते, पळते, पडते बेसावध होउनियां
घडि घडि तुज आठवुनी म्हणते ये प्राणप्रिया
बावरते, सावरते भरलें तिज प्रेमपिसें
उतरतो न दाह तिचा कामज्वर वाढतसे
धन्वंतरि तूंच तिला, रे तुझाच भरवसा
वाचवि रे सखि माझी पाजुनिया दिव्यरसा

— ० —

वैद्य अश्विनी कुमारापरी धन्वंतरि तूं खरा
अंगसंग अमृतेंच शमवी तिचिया कामज्वरा
सुसाध्य तुजसी देतां वळसे मात्रेचे केवळ
विमुक्तबाधा, होइल राधा, जाइल ती भोवळ
दया करी तिजवरी वाचवी राधिकेस राजसा
कासाविस जाहला जीव हा तुजविण वेडापिसा
जाइल कोमेजुनी जिवलगा फूल जाइचे तसें
उपेंद्रवज्राहुनी मुकुंदा कठोर होशी कसें ?
साहतो न कामदाह जाळी जीव चांदणें
चंद्र कुमुद चंदन उटि, ती सुरम्य चितनें
आठविता रतिविलास धरित प्राणजीवना
शांतवील शाम तनू पुरवि तिची कामना
पळभर विरहातें साहिना जी कधींही
प्रियकर सहवासा पापणी आड येई
सतत वधत राही लोचनें ती मिटेना
अनिमिष नजरांची ती मिठीही सुटेना
निरखित मधुमासीं रम्य चूतांकुरातें
विकसित सहकारा पाहुनीया भरातें
चिरविरह तुझा ती साहता काळकंठी
विरह विकल राधा आणुनी प्राण कंठीं
वृष्टी व्याकुळ गोकुळीं जनपदां द्यायास संरक्षण
तारी बाहुवरी गिरी उचलुनी गोविंद गोवर्धन
सानंदे व्रजसुंदरी अरुण या ओठीं जया चुंबिलें
तो बाहू बलराज कृष्ण हृदयीं भक्तांचिया बिंबले

**चतुर्थ सर्ग समाप्त**

* * *

---

[ पान १० वरून चालू ]

कॉलेजजीवन सरताना नि नौकरीच्या चाकोरीत शिरतांना आम्ही सगळेच लग्नायोग्य झालो होतो. आपापल्या नि एकमेकांच्या विवाहाबद्दल सरळसरळ बोलत होतो. अमक्यानें तमकीला मागणी घातली. तमक्यानं गुपचुप लग्न लावलं. कुणाचं पहिल्याच पाहिलेल्या मुलीशी लग्न जुळालं. तर कुणी आपल्या मामेबहिणीलाच माळ घातली...

बरोबरीचे एकेकजण ब्रह्मचर्यातून बाद होत होते. लॉटरी वेगानें फुटत होती. कोडी सोडवण्यांत जो तो गुरफटला होता. लग्नाच्या जुगारांत दानं पडत होती. कुणाला मनासारखी सखी मिळत होती, कुणी जगाला चकित करीत होते, कुणी स्वतःच मूढ बनले होते. अन् सगळे ह्या धक्का देणाऱ्या, अनपेक्षिताची गंमत दाखवणाऱ्या खेळांत मशगुल झाले होते.

कॉलेजांत मी प्रवेश केला, पण माझ्या मनानें उभार धरली नाहीं. प्रेम करावं असं प्रत्येकासारखं मलाहि वाटलं—पण मी प्रयत्नच काय, अधिक विचारहि वाढूं दिला नाही. लग्नासंबंधी गप्पा निघाल्या कीं मी नेहमीसारखं त्यातून अंग काढून घेऊं लागलो. शिक्षण संपत आलं, बाहेरचं आयुष्य सुरू होऊं लागलं—पण मी लग्नाच्या बाजारातून बाजूलाच राहूं लागलो.

मी सुदृढ होतो. सुशिक्षित, संपन्न होतो. ज्या आपल्या समाजात जशा तऱ्हेनें लग्नं जुळवली जमवली जातात त्या समाजाचा मीहि घटक होतो—व माझं लग्न तसंच जुळवलं जायचं होतं. माझ्या लग्नाचा विचार मी खूप केला होता. पद्धतशीर केला होता. शाळेत असतांना, गुजर कुळकर्णींच्याहि आधी केला होता. माझ्या परिस्थितीचा व प्रवृत्तींचा विचार केला होता आणि त्यातून माझ्या लग्नाच्या




नवलकथेहूनही विलक्षण !

## प्राणांची पंचारती

भाऊबीज, किती आनंदाचा सण ! जणूं जगांतील सर्व दुःखें ह्या दिवशीं एकत्रित होऊन दूर जातात आणि सर्व भूतलावर आनंदाचें साम्राज्य पसरते. परंतु ह्या आनंदावर सर्वस्वीं विरजण घालणारा तो प्रसंग अद्याप माझ्या डोळ्यासमोर नाचत आहे.

आज दोन वर्षे झाली त्या गोष्टीला. भाऊबीजेचा दिवस होता. आमच्या शेजारीं राहणाऱ्या छोट्या निलेचा आनंद गगनांतच नव्हे तर साऱ्या विश्वांतसुद्धां मावेनासा झाला होता. असें होणारच मुळीं, तिचा लाडका अविदादा पुष्कळ दिवसांनी भाऊबिजेकरितां पुण्याहून येणार होता ना! त्या गोड पोरीचे निळे डोळे उत्कंठेनें अविनाशच्या मूर्तीचा शोध घेत होते. तिचे चिमणे अधर अविदादाच्या गोड मुक्यासाठीं आसुसले होते. निला आणि अविनाश ह्या दोन भावंडांच्या वयांत फार अंतर होते तरी त्यांचे एकमेकांवर अतिशय प्रेम होतें. अविनाश पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजांत शिक्षण घेत असल्याकारणानें तो सदैव पुण्यालाच असायचा. तो आपल्या आईवडिलांचा एकुलता एक मुलगा होता आणि नीला सुद्धां त्याला एकच बहिण होती. दूर राहिल्याकारणानें त्या बहिण-भावाचें प्रेम पराकोटीला पोहोंचले होतें. आणि म्हणूनच निला मोठ्या उत्कंठेने भाऊरायाची वाट पहात होती.

नीला खिडकींत उभी असतांनाच समोरच्या पादपथावरून येणारा तिचा अविदादा तिला आढळला. " आई, दादा आला...दादा आला " असें अत्यानंदानें ओरडत ती जिन्यावरून पळत सुटली. तिच्यामागे तिची आई, " निले, रस्त्यावर जाऊं नको... निलेऽऽऽ " असें ओरडत धावली. पण आनंदाच्या भरांत आपल्या आईच्या ओरडण्याकडे निलेनें दुर्लक्ष केलें आणि ती सरळ " दादाऽऽ दादाऽऽ दादाऽऽ " असें ओरडत रस्त्यावर आली. तोंच...देवा ! ते दृश्य आठवतांच अद्याप अंगावर शहारे येतात. रक्ताच्या थारोळ्यांत पडलेले ते बहिण-भाऊ !...टॅक्सीच्या रूपानें आलेल्या यमानें आपल्या दोन्ही हातांनीं त्या प्रेमळ बहिण-भावांना आपल्या कबजांत घेतलें. निलेला वांचविण्यास गेलेला अविनाश स्वतः निलेसहित मृत्युच्या खोल जबड्यांत शिरला. निलेच्या आईची ती हृदयभेदक किंकाळी ऐकून देवालासुद्धां आपल्या हातून एक चुकी घडल्याची जाणीव झाली असेल...तें दृश्य...तो आक्रोश ...नको...नको...ती आठवणसुद्धां नको. आमची लाडकी नीला आपल्या अविदादासहित त्याला ओवाळण्याकरितां स्वतःच्या प्राणांची पंचारती घेऊन, आम्हां सर्वांना दुःखाच्या खाईत लोटून स्वर्गाची वाट चालून गेली. प्रत्यक्ष डोळ्यांसमोर स्वतःच्या दोन्ही मुलांची झालेली प्राणहानि पाहून बिचाऱ्या त्या अभागिनी मातेची स्थिति मात्र वेड्याहून वेड्यासारखी झाली. तेव्हांपासून वाटतें, नको तो भाऊबिजेचा दिवस यायला. देवा ! पुन्हां तरी इतका निष्ठुर होऊं नकोस !

— कु. रोझ जयवंत कोठारे

[ सर्वसामान्य माणसाच्या दैनंदिन जीवनांत केव्हां केव्हां अतर्क्य घटना घडत असतात. अशा कांहीं घटना आपल्याहि जीवनांत घडल्या असतील. त्यांतील एखादी अविस्मरणीय घटना ३००|४०० शब्दांत लिहून पाठवा. भाषेची फिकीर करूं नका. त्यावर जरूर ते संपादकीय संस्कार करूं.

सर्व लेखनसाहित्याला मानधन दिलें जातें. ]

---

अज्ञाताचा भेद घेतला होता. भेद घेतला होता आणि त्याक्षणीं माझ्या संसारी आयुष्याबद्दल, भावी वधूबद्दल धूसर, स्वप्नील, प्रभभऱ्या कल्पना विरून गेल्या होत्या. पार विरून गेल्या होत्या.

होय. फार वर्षांपूर्वी, मी वयांत येण्यापूर्वीहि माझी बायको कोण होणार हे मी हेरून ठेवलं होतं. माझं लग्न कुणी ठरवलं नव्हतं. कुणी ' ही तुझी बायको—' म्हणून मला सांगितलं नव्हतं. तरी पण मी केव्हांच ओळखलं होतं कीं गिरजाशी मला लग्न करावं लागणार. विश्वकर्म्यानें आमची जोडी ठरवूनच मग आम्हाला जन्माला घातलं आहे. त्या वयांतच मला हे उमगलं अन् जसजसा मी मोठा होऊं लागलो, अधिकाधिक विचार करूं लागलो, भोवताली बघूं लागलो, लग्नाच्या मांडवाजवळ येऊं लागलो–तसतसं मला हें सत्य जास्तच जाणवूं लागलं.

गिरजा मला आवडली होती असं नाही. तिची माझी दोस्ती नव्हती. ओळख होती, पण तीहि वाढीला लागली नाही. दुसऱ्या कितीतरी मुली आयुष्यांत डोकावल्या. घोटाळल्या. घराशेजारच्या तारामतीचं सौन्दर्य, कॉलेजांतल्या वेणूचं व्यक्तिमत्व—दोघींपैकीं कुणाशीहि लग्न करणं मला फार फार आवडलं असतं. पण माझं लग्न गिरजाशीच व्हायचं–हे माझ्या मनावर बिंबलं होतं. अन् मी इतरजणींशी जवळीक करायचं टाळलं होतं. तेवढं बंड करायची माझ्यांत ताकद नव्हती.

मी सालस वृत्तीचा. आजीनें माझं सारं केलं. सगळी इस्टेट ती मलाच देणार होती. वडिलांच्या शब्दाबाहेर मी त्यांच्या मृत्युनंतरहि गेलो नाहीं. आणि वडील तर कमालीचे जुन्या परंपरेचे अभिमानी. आमच्या ज्ञातीचे ते प्रमुख होते. आमच्या गावातले पुढारी होते. माझ्या मनाचे तर ते मानबिंदू होते. वडिलांच्या वळणाबाहेर जाणं मला जमलं नसतं नि आजीला दुखवणंहि मला शक्य नव्हतं.

पण आजीला सुचण्याआधी मला माझ्या संसाराची समज आली होती. वडील जे स्थळ बघतील ते मला पूर्वीपासून माहित• होतं आमची•जात फारच लहान. जेमतेम वीस घरं. इथें मुंबईत सात

भाईंदर-वसईकडे चार पांच, साष्टीला तीन अन् उरलेली उरणला. आजी नि वडिलांच्या मनाप्रमाणें वागायचं म्हणजे प्रेम वगैरे करणं नाहींच, पण आमच्या ज्ञातीतलीच मुलगी मुकाट्यानें पत्करावी लागणार होती.

इंग्रजी चौथीत असतांना आमच्या ज्ञाती संमेलनाला मी उरणला गेलो होतो. झाडून सगळे ज्ञातीबांधव जमले होते. मुलाबाळांसह. माझ्या बरोबरीची मुलें होती-नि मुलीहि. शकू, नवी, सुभी, वीणा, चंपा.. पण ह्या मुली माझ्या वयाच्या; एकदोघी जरा मोठ्याहि होत्या. चंपाचं तर लग्न झालेलं होतं. किशी, सुधु, वसू, नीला अगदींच छोट्या होत्या. विनया व गिरजा माझ्याहून जरा लहान होत्या. दोघीहि परकऱ्या, पहिलीतल्या होत्या. मी मुलांच्यांत खेळत होतो अन् मुलींची नांवं घोळवीत होतो.

गिरीजा !—वर्षा दीड वर्षांनी समुद्रकिनाऱ्यावर ते नांव घुमलं. आम्ही समुद्रकांठी बसलो होतो व वेडेकर आपल्या भावी सखीचं चित्र रेखाटत होता. माझं मन झुलूं लागलं अन् मग गिरीजेच्या आठवणीनें थबकलं. गिरीजा माझ्या मनांत रुजली नव्हती. सांवळी, सुमार, खेडवळी मुलगी ती. विनयापेक्षां नेटकी एवढंच. पण...

शाळेत, कॉलेजांत नि नंतर नोकरीला लागल्यावर गिरीजेचं नांव माझ्या मनांत विवाहाच्या विचाराशी संलग्न होत गेलं. प्रेम करावं, निदान खूप मुली पहाव्या असं त्या वयातहि वाटलं. पण ते सगळं अशक्य होतं ! वडिल, आजी, घराणं, ज्ञाति, संपत्ती !—ती वीस घरटी व त्यातल्या मुलींची खानेसुमारी. चाळीस पन्नासजणींत माझ्या योग्य विनया व गिरीजाच होत्या. विनया त्यांत कुरुप व गरीबाघरची होती (बिचारी लवकरच ती अपघातात वारली—तिला कुठला नवरा मिळाला असता ?) गिरीजाच-गिरीजाच माझी बायको होणार. कांहीं वर्षांनी, योग्यवेळीं तिचे वडिल माझ्या वडिलांकडे येणार. माझे वडिल हो म्हणणार. (माझ्या होकाराचा प्रश्नच नाहीं-) आणिक स्थळं कुठली येणार ? ज्ञातीतल्या बाकी सर्व मुली जरा मोठ्या अगर खूप लहान. फक्त गिरीजाच !

गिरीजा त्यानंतर दोनतीनदां भेटली. एका लग्नसमारंभात, एकदां ज्ञातीच्या सहलीत, एकदां रस्त्यांत एकटीच ! पण मी बोलायचं धाडस केलं नाहीं. (आतुरताहि नव्हती.) मित्रांच्या गप्पांत व एकांतांत मात्र ती रोज भेटूं लागली, आठवूं लागली. माझी ती भावी वधू हे मी हेरलं नि माझं गप्पातलं, कल्पनेतलं स्वारस्य सरलं. साठेला, गुजरला, वेडेकरला नि महाडिकलाहि लग्न म्हटलं म्हणजे एक अद्‌भुत्, अज्ञात गूढ वाटायचं. क्षितीज फोडून कुणा स्त्रीचं दर्शन घ्यायला त्यांची झेप जायची—तसं मला कांहीं होईना. कॉलेजांत काव्याला बहर आला, नोकरीत वधूपरीक्षेचा जोर सुरू झाला. सगळे रंगले. आयुष्याचे पत्ते पिसूं लागले. जोड्या जमूं लागले. मी मात्र थंड, पानं खाली ठेवून बसलेला, जे ओळखलंय् तेच ऐकायची वाट पहात असलेला, ललाटरेषा माहित असूनहि चुकचुकणारा...

••तारुण्यातलं राणीपान मी पाहिलं होतं...

(योग्यवेळीं, संचितानुसार माझं लग्न गिरीजेशीच झालं—हे सांगायला पाहिजे काय ?)



• चणे टाकल्यावर किनाऱ्याशी मासोळ्यांनी कालवा करावा, तसा लंच टाईमची वेळ झाल्यावर फोर्टमध्यें गलका माजला आहे.

कुठल्याशा लंचहोममध्यें तो बसला आहे. सगळ्या जागा भरल्या आहेत व पॅसेजमध्यें लोक खोळंबून उभे आहेत. वेटर्सना उसंत नाहीं. स्पेशल रूममध्यें हालचाली होत आहेत व गल्ल्यावर नाणीं उपसली जात आहे. लोक चमच्याकाट्यांनी बकाबका खात आहेत. उष्ट्या बशा उचलायच्या आंत नवे लोक खुर्च्या अडवून ऑर्डर सोडीत आहेत.

तो कोपऱ्यांत पंख्याच्या झोतांत बसला आहे. पुडिंग पुढ्यांत ओढून;...सिगरेटवर राख सांचूं देत. वाऱ्यावर रुखे केस उधळत आहेत. तोंडावरची सुरकुती मात्र सरकत नाहीं. विमनस्कपणाची माशी आंबलेल्या मनावर बसली आहे. एवढ्या घाईगर्दींत तो अगदीं अलग आहे.

सताड, शून्य डोळ्यापुढें उजाड माळरान दिसत आहे. पालं, झोपड्या, मातीची घरं...दुपारची भाकरतुकड्याची वेळ. झणझणीत तिखट, लोटालोटा पाणी, आंब्यालिंबाच्या सावलीचा घेर...सपाट पोटांची माणसं. उष्ट्या शिळ्यावर जगणारी जमात...उपासमार, चोऱ्यामाऱ्या...खांद्यावर भाकऱ्या बांधून कोसकोस वाटचाल करून शाळेला जाणारी मुलं...

अगदी स्पष्ट दृश्यं. पण फार वर्षांपूर्वीं, झोपेंत पाहिल्यासारखी. एखाद्या पांढरपेशानें दुरून पहावं तशी.

मेलेल्या गुराढोरांची धुडं. अन् समोरच्या बश्यांतली कोंबडीची तंगडी...

खरं म्हणजे यावेळेला चारी मित्रांनी काळ्या घोड्याशीं जमायचं ठरलेलं आहे. प्रथम दोनचार दुकानं हिंडून चांगलं 'वेडिंग प्रेझेंट' खरेदी करायचं, मग कुठें तरी जेवण घ्यायचं, संध्याकाळीं पाटणकरच्या लग्नाला जायला म्हणून परत एकत्र जमायचं—कधी पासूनचा हा बेत ठरला आहे.

कॉलेज आयुष्यांतला रुममेट. नंतर परदेशांतहि भेटलेला. जात आड आली नि पाटणकरला योग्यशी नौकरी मिळाली नाहीं. परवडच चालू आहे. पण त्यांच्या जातीनेंच त्याला सुबकसं आयुष्य, दिवस दिले. अन्न, शिक्षण दिलं...अन् आतां साजेशी सुशिक्षित बायकोहि मिळवून दिली.

पाटणकरचा हेवा नाहीं. पाटणकरलाच त्याचा हेवा वाटावा. त्याच्या नौकरीचा, अधिकाराचा...एकमेकांत दोस्ताना आहे. त्याला अहेर करण्यासाठीं एक महिन्याचा पगार त्यानें बाजूला काढला आहे. अन् संध्याकाळीं तो रिसेप्शनच्या वेळेस जातीनें खपणार आहे.

तरीपण अस्वस्थता. म्हटलं तर असूयाहि. पाटणकर बद्दलच केवळ नाहीं, तर परुळेकरबद्दल, डिक्रूसबद्दल. अगदी नव्या लागलेल्या देशपांडे कारकूनाबद्दल सुद्धा.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास






# रंगबंध

ह्या मातीनें पाय रंगले
लाली चढली अंगांगावर
ह्या हिरवळिनें नेत्र भारले
झालें काजळ हिरवें गार;
ह्या मातीची चढली लाली
सळसळणाऱ्या रक्तवरती
रानमाळची हिरवी माया
चढली मनच्या स्वप्नांवरती;
मला न कळतां माझ्यावरती
मिनाकाम हें जडलें घडलें
विसरुन गेलें माझेंपण मी
आणि बाहुली रंगित झालें...
कधींतरी पण वीज उफाळे
लाल नि हिरवे रंग दुभंगुन
रंगबंध तोडून उचलतें
माझें पाऊल, अन् माझें मन;

— इंदिरा

देशपांडे कुरुप आहे, अशक्त आहे. नौकरी तात्पुरती अन् प्रगतिचीहि आशा फारशी नाहीं. तशांतच देशपांडेनें त्याच्याकडून कर्ज काढून लग्न उरकलं. बायको देशपांडेसारखीच. तेव्हां त्याला चीड आली; आतां वाटतं, ठीक आहे, निदान ती देशपांडेला साजेशी आहे.

पाटणकरची वधू...देशपांडेची बायको...गांवाकडच्या बालपणच्या संवगड्यांच्या कारभारणी...

लंच टाईम संपत येते, पण गर्दी हटत नाहीं. त्याच्या डोळ्यापुढें लहानपणचे दोनचार मित्र उभे राहतात. कोवळ्या वयांतच त्यांची लग्नं झाली. तेव्हांच्या मूर्ख, झिपऱ्या पोरट्या...आतां लेंढारं वागवणाऱ्या महामाया...कशाहि असल्या तरी नवऱ्यांना अनुरूप. त्यांच्या चाकोरींत चपलख बसणाऱ्या. जातींत, संस्कारांत सामावणाऱ्या !

त्यातलीच एक तरुण मुलगी डोळ्यापुढें आकारूं लागते. अगदी अस्पष्ट—अन् अडाणी, अशिक्षित जातींतली. वडिलांनी ठरवलेली, कुणीं म्हाताऱ्यानें कडेवरून आणलेली...

सिगरेटचं थोटूक बुटाखालीं चिरडून तो हात चोळतो. छे—शक्य नाहीं—तो पुटपुटतो. मामाचं पत्र खिशांतच असते. जातीच्या पुढाऱ्याचा आवाज कानांत घुमतो. तो उठावा म्हणून आशाळभूतपणें पहाणाऱ्या लोकांची व त्याची दृष्टादृष्ट होते. तो खुर्चीवरून उठतो. हॉटेलबाहेर येतो. पुन्हां तसाच दाराशीं उभा राह्तो.

फूटपाथवर उलटसुलट लोक फिरत आहेत. त्याचे डोळे स्त्रियांच्या आकृति तेवढ्या टिपत आहे. झग्यांतल्या, साड्यांतल्या. लिपस्टिक लावलेल्या, नॉयलॉन नेसलेल्या. पोटं दाखवणाऱ्या, स्तनवैभव मिरवणाऱ्या. सगळ्याच सुधारणेच्या, सुशिक्षिततेच्या, निर्भयतेच्या, आत्मविश्वासाच्या सुवासानें सतेज वाटणाऱ्या. व्यक्तिमत्वानें नटलेल्या.

ह्यांतीलच...अशीच...शेजारच्या ऑफिसांतली नीलांबरी. बसमध्यें भेटणारी शेलाटी मुलगी. परुळेकरची बहिण...

जागच्या जागी तो चुळबुळतो. मग न कळत चालूं लागतो. शिक्षण संपलं, नौकरी लागली—आतां विवाहाच्या वाटेवर त्याचं मन ओढ घेत आहे. होय, लग्न तर करायचं आहेच. दारिद्र्याच्या दमछाकीत, मागासल्या जातीच्या लाचारींत, शिक्षणाच्या चढाओढींत उपासमार झाली आहे वासनेची. आता स्त्री हवी आहे. सगळ्यांची लग्न होत आहेत. आज पाटणकरचंहि...

मित्रांची उत्कटतेनें आठवण होते. बाजूच्या दुकानाच्या शो विंडोकडे नजर जाते. काय खरेदी केली असेल ? कीं माझ्यासाठीं थांबले आहेत ? त्याला स्वतःची शरम वाटते. जुन्या दोस्ताचं आज लग्न नि आपण...

पण घाई करण्याऐवजी तो बसस्टॉपशी रेंगाळतो. समोरच्या चौकामधल्या अळ्याऐवजी त्याला लग्न घरांतली बाग दिसते. बँड वाजल्यासारखा वाटतो. भरजरी कपडे ल्यायलेल्या स्त्रियांची भरती. हें मिस्टर अँड मिसेस...ते नि त्यांच्या त्या पत्नी...कितीतरी असलेल्या अनुरुप जोडपी आणि त्यांत तो एकाकी...

मामांचं पत्र. तुझं वय झालंय–नि आमचंहि. आतां तूं लग्न करावंसं हेच खरं. पुढाऱ्याचा उपदेश. जातीला विसरूं नकोस. जातीनेच तुला जन्म दिला, शिक्षण देऊन मोठें केलें...

विलक्षण अस्वस्थता. मुंबईचा बारमासी घामट उकाडा. तो बसस्टॉप सोडून चालूं लागतो कचेरीकडे...

एकदम पाटणकर कानांत पुटपुटतो, कुणीहि पोरगी तुझ्या गळ्यांत माळ घालील–जातचित आतां जुन्या इतिहासांत जमा झालंय वेड्या. तुझ्या विचारांशी तद्रूप होणारी मुलगी तुला मुंबईतच मिळेल.

कुलाब्याकडचा, कचेरीचा रस्ता...रिकाम्या ओढयांतून गांवाकडे जाणारी वाट...

...शेलाट्या कांचनमालेचा हात धरून तो घराकडे धावत आहे. गांवढ्याची ओढ, जातीचा अभिमान, आपल्या लोकांचा उद्धार करायची सतत बाळगलेली स्वप्नं. पण कांचन मरगळलेली आहे. 'कुठल्या मसणवटींत मला आणलंस रे—' म्हणते आहे—हें कचकड्यांचं, परजातीचं ध्यान आणलं म्हणून खोपटाखोपटांतून गोफणगुंडे सुटत आहेत...




तो अडखळतो. कांचन कुठली, गांवाकडची एक वेंधळी मुलगी त्याच्या मागोमाग येत आहे. सगळे हसतात. तो चिडतो—तो हचकतो व एका कॉफीगृहाशी थबकतो.

कॉफीगृहांतून दोन तरुण स्त्रिया पर्स सावरीत व पदर फडफडवीत येतात. त्याला डावी घालून फूटपाथच्या गर्दीत मिसळतात. तो ओथंबल्या वासनेनें त्यांना पहातो. आणि त्याच्याकडे बघत असते बाजूची तरुण भिकारीण. मूढ, बेवारशी.

त्याचे तीन मित्र काळ्या घोड्याशी थांबले आहेत. मामाचं अजीजीचं पत्र खिशांत आहे. काळ्या कॉफीचे घोट घेत तो बसून राहिला आहे. सिगरेटच्या धुरांतलं प्रश्नचिन्ह पहात.......

• • •



कुणीतरी म्हणालं, कृष्णा सरदेसाई गांवांत आली आहे.

अळवाच्या खाचेशीं आंघोळ करीत मी सिनेमांतलं गाणं स्तोत्रासारखं गुणगुणत होतं. परसांतल्या गप्पा, चिलटं कलावीत तशा, दूर सारीत होतो. कृष्णाचं नांव उगाचच गोमाशीसारखं मेंदूभोंवती गरगरलं अन् मग एकदम माझं शरीर ताठ झालं.

पोत्यावर मांडा ठोकून दाजी श्मश्रू करून घेत होते. पायन्यावर नानू विड्या फुंकीत होता. आपल्या विन्हाडांत फेन्या घालीत आण्णा बोलायला म्हणून बाहेर तोंड काढीत होते. आमच्या काकूच्या नि लुकतुक्यांच्या वहिनींच्या विहिरीपासून घरापर्यंत पाण्याच्या खेपा चालू होत्याच...नेहमींचाच मांड नि नेहमींसारखंच गावगप्पांचं अग्निहोत्र. कृष्णेचा उल्लेख करून मग संक्रात आली होती आणिक कुणा दुसऱ्या पळून गेलेल्या मुलीवर!

माझं ध्यान मात्र कृष्णेच्या नांवाशी थबकलं. कृष्णेबद्दल काय बोलणं झालं तें पुरतं मला कळलं नाहीं. कृष्णा लग्नानंतर प्रथमच, जवळ जवळ पंधरा वर्षांनी गांवांत आली आहे, अंगानें खूप सुटली आहे, केस पांडुरके झाले आहेत...माझं लक्ष वेधण्यापूर्वींच गप्पांची गाडी भलत्या रुळावर गेली होती.

स्नान आटोपून ओलेत्यानें घरांत गेलो. मन चुटपुटतच होतं. कृष्णा, कृष्णा...कृष्णा सरदेसाई...कृष्णा सरदारजी...कृष्णा... माझं मन कृष्णेभोवतीच प्रदक्षिणा घालीत होतं. लहानपण आठवलं. तें खेळ, तो दंगा...मुलांच्या बरोबरीनें वागणारी सरदेसायांची कृष्णी हायस्कूलांतच तिच्याबद्दल उठलेल्या कंड्या...बेचाळीसच्या चळवळींत तिला झालेली शिक्षा...अन् मग तिचं लोकविलक्षण लग्न... कृष्णेचा चित्रपट देवघरांत पहात पूजा करीत बसलो.

"आई, सरदेसायांची कृष्णा आली आहे म्हणे—" आई निर्माल्य उचलूं लागली तशी मी म्हटलं.

"मग ठाऊक नाहीं कां तुला? परवांच आलीय, तिची आत्या मरायला घातलीय ना. तिनेच केलं कृष्णेचं. तिला भेटायला आलीच आता...म्हातारीला दृगा दिलान् नि आतां..."



## गाडीस खेंचण्यास बंदिवान

अंदमानमध्यें गाडीमध्यें सरकारी अधिकारी बसतात आणि ती ओढण्यास बैल घोडे इत्यादि पशूंस लावलें असतां होणारा खर्च टाळतां यावा म्हणून बंदीवानांस लावतात. एकसारखी दौडीनें ती गाडी ओढीत नेतांना आणि मोठमोठ्या चढणीवरून धापा टाकीत ती गाडी ओढतांना आणि "चलो साला! कैसा चलता है!" म्हणून वर शिव्या खातांना बंदीवान वारंवार जिकडे तिकडे पाहण्यांत येत. ही रीत न आवडून बंदीवानांकडून आपली गाडी खेंचून न घेणारे एकदोन इंग्रजी अधिकारीहि मला माहित. पण ती गाडी खेंचण्यास साफ नाकारणारे बंदीवान मात्र कोणास माहित नव्हते.

(माझी जन्मठेप—स्वा. वि. दा. सावरकर)

आतेच्या नि वडिलांच्या संमती विरुद्ध कृष्णानें लग्न केलं, तेंही, परमुलखांतल्या, पर जातीच्या, परधर्माच्या एका पुरुषाशी. एका शीख तरुणाशी. पंधरा वर्षांपूर्वी गावांत उसळलेली कुटेची व संतापाची लाट—त्याचा एक कढ आईच्या उद्गारांत उमटला.

मी विचारलं, "तूं पाहिलीस तिला?—"

"मी कशाला जाऊं?...पण पहायच्याय एकदां! किती सुखालीय...काय मिळवलंन् तें—"

मी कपडे चढवले. पायजम्याला क्लिप्स् लावल्या व हातांत पिशवी घेतली. आईचा उगाचच राग आला. कृष्णा काय मत्स्यालयांत आणलेला नवा मासा आहे?—अन् शीखाशी लग्न केलंन् म्हणजे माणसाशीच केलंन् ना तिनें! मला वाटलं, आईला कृष्णेबद्दल विकृत कुतूहल आहे, तिचा संसार कसा चाललाय, ती त्यांत रुळली आहे कीं पस्तावली आहे, हें कळून घ्यायची ओढ आहे...

आळी ओलांडून मी बाजारात आलो. देवळाच्या भिंतीवर उभं केलेल्या मोफत वाचनालयाशी असलेल्या लोकांतून धर्माच मला उठून दिसला. सिग्रेट फुरकत तो कष्टानें टाईम्स वाचीत होवा. धर्माला पाहून मी दचकलो. धर्मानें पूर्वी एका ब्राह्मणाच्या मुलीशी लग्न केलं होतं. इथें नाहीं, पुण्यास. पहिले कांहीं दिवस जग ठोकरण्यांत गेले—पण मग धर्माच्या संसारांत धुसफूस सुरू झाली. त्याचा तेढा संसार मोडल्यानें सगळ्या गांवाच्या पोटांत गुदगुल्या झाल्या होत्या. धर्मा सरदेसायांच्याकडे कांहीं दिवस कौंपौंडर होता. जेव्हां कृष्णा हरताळ व प्रभातफेऱ्यांत गर्क झाली होती तेव्हां धर्माला कळलंय कीं कृष्णा गांवात आली आहे म्हणून? कृष्णानें पळून जाऊन शीखाशी लग्न केलं तेव्हां धर्माला काय वाटलं? कृष्णेला त्यानेच अशा जगावेगळ्या लग्नासाठी नकळत स्फूर्ति दिली असेल?. धर्माला आतां काय वाटतंय? त्याच्या सारखाच तिचाहि संसार मरगळावा, असं? काय आवडेल त्याला—तृप्त कृष्णा कीं दग्ध कृष्णा?—

अनुक्रमणिका

सायकलच्या दुकानांत जुळे देवधर होते. आजची सकाळ सायकलवाल्याकडे काढायचा त्यांचा बेत दिसत होता. कॉफी पावडरच्या रंगाचे डोळे असलेले ते दोघं देवधर म्हणजे गांवाचं गटार, पंचनामा, बातमीपत्र—सारं कांहीं होतं.

मी सायकल मागण्याआधींच दोघांच्या प्रश्नांची जुगलबंदी सुरू झाली.

"वाडीवर वसुलीला कां ?"

"मिळणार कां पण वसुली ?"

"निदान शिदबाकडे अंड्याचं पिठलं ?"

मी कांहींच बोललो नाहीं तशी त्यांनी नजरा रोखल्या व नको ती सरबत्ती सुरू केली.

"आज तब्येत नाखुष दिसते रे ?"

"कृष्णा आलेली कळलं नाहीं वाटतं ?"

"वाडीची वाट सरदेसायांच्या बंगल्यावरून जाते ना ?"

"कीं कृष्णा दुःखी म्हणून तुला पण सुतकी म्हणायचं काय ?"

"कृष्णा दुःखी कीं आत्या मेल्यावर इस्टेट मिळणार म्हणून हॅपी ?"

"मग त्या दाढीवाल्याजवळ गडगंज आहे नारे ?"

"गडगंज केसांचं जंगल ! कृष्णेला तो छळतो नारे ?"

"डायव्होर्स नक्की घेईल ती..."

"नाहींतर साली सरदारजीलाच इथे आणून बसवील."

एव्हांना मी सायकल घेऊन मार्गाला लागलो होतो. पण चाकावरची चेन घसरल्यासारखं मला होत होतं. जुळ्या देवधरांची नेहमीच चीड येते. पण आज त्यांनी कहरच केला, सरळच हल्ला केला. आणि संताप दाखवायलाहि सवड ठेवली नाहीं मला. मी कसा उलटून बोलणार ? आम्ही अजाण असताना नवराबायको खेळत होतो, तेव्हां ह्या दुतोंड्या देवधरांनीच कृष्णेच्या आतेकडे कागाळी केली होती.

सायकल हातानें ढकलीत मी चालतच होतो. नकळत देवधरासारखाच विचार करूं लागलो. आत्या गेल्यावर इथल्या घरचं, शेतांचं, दागिन्यांचं कृष्णा काय करील ? विकून दिल्लीला परतेल ? कीं नवऱ्यालाच इकडे आणेल ? जुळ्या तर म्हणतोय कृष्णा घटस्फोट घेईल, तिचं नवऱ्याशीं पटत नाहीं...अशक्य नाहीं ! कृष्णेचं वळण, वृत्ती, सगळं इथल्या वास्तूंतलं. ती कायमची कशी राहील तिकडे ? तिला स्वच्छतेची आवड नि नवरा तर सरदारजी. तिला कोंकण प्यार, मराठी नाटकांचं वेड—आणि आतां तिचं जीवन जखडलं मोटरचे जुने, सुटे भाग विकणाऱ्या, पहाडगंज मध्यें राहणाऱ्या जंगली इसमाशी. छे, तारुण्याच्या तिरीमिरीत केलेल्या कृत्याबद्दल कृष्णा हळहळत असेल मनोमनीं झुरत असेल. बंड करायला धडपडत असेल.

कोपऱ्यावरून विड्या घेतल्या. एक पेटवली व बाजारचा रस्ता ओलांडली. मामेबहिणीची मूर्ति अकारण आठवली. श्रीमंताघरीं तिला दिली. श्रीमंती, पोशाखी, 'सोसायटी' त ती वावरूं गेली व मग सर्व सर्व विसरली. वृद्ध आईबापसुद्धां. सगळे संस्कार, आवडीनिवडी, स्नेहसंबंध गुंडाळून ठेवून रातोरात ती नव्या, चकमत्या आयुष्यांत मिसळून गेली.

अशा कितीतरी मुली बदलतात...कृष्णा तर नव्यासाठीं निरनिराळ्यासाठीं धडपडणारी...

सायकलवर स्वार होऊन मी गांवाबाहेरच्या वाटेला आलो आहे हे जाणवून मी स्वतःशीच चमकलो. कृष्णेबद्दल विचार करण्यांत मी पुरा गर्क झालो होतो. मला काय करायचं होतं ? लहानपणची मैत्रिण असली तरी काय झालं ? हायस्कूलांत गेल्यावरच बोलणं बंद झालं होतं. पळून जाऊन लग्न केलन् तिनें, तें असंच कुठें चव्हाट्यावर ऐकलं होतं. त्यानंतर इतक्या वर्षांत तिचं दर्शन नाहीं. तिच्याबद्दल कांहीं ऐकलंहि नाहीं. कशाला हें वांझोटं कुतुहल ?— अन् कृष्णा फसलीं, ती दुःखी आहे हें पटवायचा कां अट्टाहास ?

बिडीचं थोटूक मी टाकून दिलं. जणूं कृष्णेची आठवण भिरकावून दिली. राहूं दे विचारी सुखी. अशी लग्नं नेहमीच अयशस्वी होतात असं थोडंच आहे ? कृष्णा नेहमीच विचारी मुलगी होती. दिलाचीहि होती. डोळे उघडे ठेवूनच तिनें प्रियकर पत्करला असणार. अन् त्याची साथ ती कधीहि सोडायची नाही. शीख म्हणजे कुणी खलमाणूस कां असणार ? नक्कीच तो निराळा, चांगला असेल. प्रेमळ, सुसंस्कृत, दाढीमिशांना चाट दिलेला.

कृष्णा सुखांत असावी, असूं दे, ह्या विचारानें मी सायकल जोरांत पिटाळली. मग एकदम लक्ष्यांत आलं कीं शिदबाकडे वसुलीला जायची आज जरूरी नव्हती. आज आपण खताच्या खरेदीलाच जाणार होतो. पण आंघोळ करतांना एकदम उसळी आली नि मग तडक ह्या रस्त्याच्या धारेंत सांपडलो. कृष्णेचं नांव ऐकल्यामुळे ! कृष्णेचं घर वाडीच्या वाटेवर आहे म्हणून !

खरंच मी सरदेसायांच्याकडे चाललो होतो. कृष्णेला भेटायला, तिला पहायला ! खाली उतरून आणखी एक बिडी ओढावीसं वाटलं. पण खिशांतल्या बिड्यांचीच लाज वाटूं लागली. कृष्णा बोलेल का ? ओळखेल कां तरी ? औपचारिक बोलली तर पुन्हां बोलावेल कां ? मनांतलं कथन करेल कां ?—कीं तिच्याकडे जाणंच चुकीचं आहे ? आजवर त्या घरांत पाऊल ठेवलं नाहीं. तिची आत्या तर सिरीयस आहे. कितीतरी गांवकरी फुकट्या कुतूहलानें तिच्याकडे गेले असतील...तसंच आपणहि !......

उलट सुलट विचारांतून मी पॅडल मारीत मार्ग कापीत होतो. सरदेसायांचा निळा बंगला नजरेच्या परीघांत आलेला होता. आईचे उद्गार, जुळ्या देवधरांची वाजलेली तोंडं आठवत होती. धर्मा दिसत होता, मामेबहिण दिसत होती. सगळं गांव जणूं गांठोडं करून माझ्या मानगुटी आलेलं होतं. कृष्णा सरदेसाई कुठल्या अवस्थेंत असली कीं बरं वाटेल त्याचा अंदाज मला घ्यायला लावत होतं. समाधानी संसारी स्त्री कीं फसलेली दुःखी प्रौढा ..

कृष्णाच्या दिशेनें मी जात होतो अन् तडफडत्या कुतुहूलानें तिला न विचारायचा प्रश्न मनाशी घोकीत होतो.

—तूं सुखी आहेस कां ?...तूं दुःखी आहेस ना ?

• • •








# काळ बोलतो आहे

१८१७ सालच्या नोव्हेंबर महिन्यांत शनिवार वाड्यावर इंग्रजांचें निशाण फडकलें आणि पर्यायानें सारा देश परतंत्र झाला. पारतंत्र्य आलें पण भारतीय मनाची स्वातंत्र्याची कांक्षा लोपली नाहीं तर दिवसेंदिवस वाढीला लागली. १८८५ मध्यें स्थापन झालेल्या राष्ट्रसभेनें या महत्वाकांक्षेला रंगरूप दिलें आणि भारताच्या स्वातंत्र्य लढ्याचें एक नवें पर्व सुरू झालें. गेल्या पाऊणशें वर्षांचा हा रोमहर्षक आणि स्फूर्तिदायक इतिहास म्हणजे भारताच्या स्वातंत्र्य लढ्याचें आधुनिक भारत. या ओजस्वी कालखंडांत अनेक राष्ट्रवीरांनीं, क्रांतिकारकांनीं आणि देशसेवकांनीं आपल्या प्राणांच्या पायघड्या घालून स्वातंत्र्याचा मार्ग निष्कंटक केला. परकी राजसत्तेच्या जुलमी दडपशाहीविरुद्ध भारतीयांनीं एकजुटीनें संघटित लढे दिले. या समरप्रसंगांची धारातीर्थे म्हणजे जालियनवाला बाग, लाल किल्ला, आगाखान पॅलेस, अंदमान—यासारखीं महान् क्षेत्रें.

ही पवित्र तीर्थक्षेत्रें म्हणजे भारतीय क्रांतीसमराचे निःशब्द साक्षीदार ! क्रांतीच्या धगधगत्या ज्वालांत या महान् वास्तु होरपळल्या—पण अनेक भारतीय तरुणांना आपलें पूर्वदिव्य किती उज्ज्वल होतें याची साक्ष देण्याचें काम त्या अव्याहत करणार आहेत.

ऑगस्ट क्रांतीच्या संस्मरणप्रसंगीं हे मूक साक्षीदार बोलके झाले तर आपलें मनोगत कसें सांगतील ? दीपावलीच्या कांहीं साहित्यिक मित्रांनीं त्यांच्या अंतरंगाचा ठाव घेण्याचें हें अवघड कार्य केलें आहे. भारतीय क्रांतीच्या अनेक ज्ञात आणि अज्ञात हुतात्म्यांना दीपावलीची ही भावपुष्पांजलि !

★ बाळ सामंत ★ अ. सी. केळूसकर ★ बु. रा. बेहेरे

★ व्यं. गो. अंदूरकर ★ गोविंद तळवलकर ★ काशिनाथ पोतदार







*मराठी वैभवाच्या उत्कर्षांचा हा ऐतिहासिक साक्षीदार ! हा पुराणपुरुष अजूनहि अनेक आपत्तींना तोंड देऊन पुणें शहरांत अजून खडा ठाकला आहे. एखाद्या महापराक्रमी पण वार्धक्यानें जर्जर झालेल्या धुरंधर महारथींसारखा. साऱ्या महाराष्ट्रानें अभिमान बाळगावा अशी ही महान वास्तु* **बाळ सामंत** *यांनीं बोलकी केली आहे.*

# शनिवारवाड्याची कहाणी

"**का**का–काका मला वांचवा"

अजून ती करुण किंकाळी माझ्या कानांत घुमतेय ! श्रीमंत नारायणराव पेशवे यांची ती करुण किंकाळी नव्हती, तर महाराष्ट्राच्या स्वातंत्र्यलक्ष्मीनं फोडलेली आर्त किंकाळी होती. शिवप्रभूनीं बांधलेल्या आणि महाप्रतापी थोरल्या बाजीरावांनीं बलशाली केलेल्या महाराष्ट्राच्या स्वातंत्र्य मंदिराची वास्तु ढांसळत होती. त्या भयाण घटनेचा तो अशुभ शकुन होता. शत्रूच्या तोफांनीं केलेल्या गोळागोळीनें कधीं मला तडा गेला नाहीं तो या अशुभ अशा किंकाळीनं माझं काळिज थरथरलं—हृदय दुभंगलं आणि त्याक्षणापासून माझी समर्थता लयाला गेली. मी चेतनाहीन झालों.

मला वाटतं वैभवाच्या शिखरावर सदैव वास्तव्य करणाऱ्याना दुर्दैवाचा अधःपात सहन करण्याची ताकद उरत नसावी. कारण माझ्या हयातींत मी तर महाराष्ट्रराज्याच्या उत्कर्षाचा दैदिप्यमान काळ पाहिलेला. शके १६५१ माघ शु. ३ म्हणजे १० जानेवारी १७३० रोजीं माझी समारंभपूर्वक पायाभरणी झाली. माझे धनी आणि महाराष्ट्राचे वीरभूषण थोरले बाजीराव हे त्या काळांत सासवडला राहात होते. त्याच सुमारास पुण्यश्लोक शाहूमहाराजांनीं १७२६ मध्यें थोरल्या बाजीरावांना पुणें गांव वंशपरंपरा इनाम देऊन त्यांच्या स्वामिनिष्ठेचा आणि प्रतापाचा यथायोग्य गौरव केला. पुणें गांवाची पुण्याई फार मोठी. मराठी राज्याच्या संस्थापनचा श्रीगणेशाः शिवरायांच्या हातून गिरविणारे दादाजी कोंडदेव याच पुण्यभूमींत राहात होते. त्यांच्यामागोमाग महाराष्ट्राची ती स्फूर्तिदेवता-शिवछत्रपति पुण्यभूमींतच अनेक वर्षें वास्तव्य करीत होती. त्या दिवसापासून वीरांना आकृष्ट करण्याचें या मातीला जणूं वेडच लागलें. मोंगल सुभेदार शाहिस्तेखान यालाहि ही भूमि पसंत पडली आणि त्याच्यामागोमाग राजपुतांचे बलशाली सरदार जसवंतसिंघ आणि जयसिंघ यांच्या वास्तव्याचाहि लाभ पुणें गांवाला घडला.

माझ्या पक्कं स्मरणांत आहे—महाप्रतापी बाजीराव पेशव्यांना शिवरायाच्या गुणगौरवाचं अनिवार वेड होतं. त्या महाराष्ट्राच्या राजराजेश्वरांची गर्हिवरून याद निघाली नाहीं—आणि त्यांच्या पुण्याईचे पवाडे गायले गेले नाहींत असा एकहि दिवस कधीं सुना गेला नाहीं. मोठमोठ्या स्वारीवर जाण्यापूर्वी त्या महाराष्ट्रसूर्याच्या प्रतिमेपुढें साक्षात् दंडवत घालून आणि त्याचे आशीर्वाद घेऊनच थोरल्या बाजीरावसाहेबांनीं निजामाला सळो कीं पळो करून सोडलं. शत्रूंची दाणादाण उडवली. छत्रपतींच्या आशीर्वादासाठीं त्यांचं मन आसुसलेलं होतं. तें पुण्यनाम कानीं पडतांच त्यांची कधींहि न वांकणारी ताठ मान नम्रतेनें लवे. आणि म्हणून कसब्यांत जिथं शिवराय राहात होते तेथली माती स्वहस्तें जागेवर टाकून थोरल्या बाजीरावसाहेबांनीं माझी पायाभरणी केली.

—मराठी पराक्रमाचं केंद्रस्थान– स्फूर्तिस्थान अशी महान् वास्तु निर्माण करण्याचं बाजीरावसाहेबांचं ध्येय होतं. तेथल्या तरवारींच्या खणखणाटाचे ध्वनिप्रतिध्वनि साऱ्या हिंदुस्थानांत उमटून शत्रूंची काळजं हवालदिल झाली पाहिजे आणि मराठी सत्तेची प्रभा सर्वत्र फांकली पाहिजे असा त्यांचा मनसुबा होता. साऱ्या भारताच्या सरदारदरकदारांनीं—राजेरजवाड्यांनीं या महान् वास्तूच्या आवारांत मराठी सत्तेला मानाचा मुजरा केला पाहिजे, असा त्यांच्या जीवाचा अट्टाहास होता. हिंदुस्तानचं सारं कलाकौशल्य पुण्यभूमींतल्या या राज-वास्तूंत हजेरी लावण्यासाठीं जमा झालं पाहिजे आणि मराठी मुत्सद्यांची तीव्र बुद्धिमत्ता याच वास्तूंतील खलबतखान्यांत मराठी कर्तृत्वाचा इमला गगनभेदी करण्यासाठीं पणाला लावली गेली पाहिजे असं त्यांचं मनोमन स्वप्न होतं.

आणि यासाठीं दोन वर्षे अहोरात्र खपून मराठी कारागिरांनीं १७३२ सालच्या रथसप्तमीस म्हणजे २२ जानेवारीस माझी मूर्ति घडवली. आणि त्यादिवशीं श्रीमंतांनीं विधिपूर्वक वास्तुशांति केली.

पुण्यनगरीला एक भाग्यस्थान प्राप्त झालें. महाराष्ट्राचा राज्यकारभार याच ठिकाणांहून हांकला जाऊं लागला. पण थोरल्या बाजीरावसाहेबांचा शिवप्रभूंचा ध्यास कांहीं ओसरला नाहीं. त्यांनीं अवघ्या तीन वर्षांतच माझ्या पूर्वेस असणाऱ्या लाल महालाचा भक्तिभावानें जीर्णोद्धार केला. स्वारीचा त्या दिवसाचा आनंद काय वर्णावा. पूर्वजांच्या ऋणांतून मुक्त होण्यासाठीं एका वीरपुरुषाची ती धडपड होती. याचे पुण्याईवर आपण जगत आहोंत आणि याच







पुण्याईवर महाराष्ट्र देश मोठा होणार आहे याची जाणीव व्यक्त करण्यासाठीं त्यांचा तो प्रयत्न होता.

आणि खरं सांगू–त्यानंतरचा तो तीस वर्षांचा मराठी सत्तेच्या उत्कर्षाचा काळ कसा भुर्कन गेला हें माझं मलाच कळलं नाहीं. १७५८ मध्यें तर एकाच वर्षी माझ्या आवारांत पेशवे घराण्यांतील २० महान् व्यक्ति एकत्र राहात होत्या आणि त्याच काळांत कमींत कमी रोजी १००० लोकांची आवक जावक होती. त्यांत वीर पुरुष होते मुत्सद्दी होते–कलाकार होते–देशाच्या कानाकोपऱ्यांतून नाना तऱ्हेची आणि नाना दर्जाची माणसं दिल्ली दरवाजांतून आंत आली आणि बाहेर गेली—

पण आयुष्यांत बरेवाईट प्रसंग यायचेतच ! मी सुखाचा उत्कर्ष पाहिला आणि दुःखाचा कडेलोटहि पाहिला. पानपतच्या त्या घोर रणसंग्रामामुळें साऱ्या महाराष्ट्रावर जी दुःखाची अवकळा पसरली ती मी पाहिली. पण त्याहिपेक्षां बाळाजी विश्वनाथ उर्फ नानासाहेब पेशवे यांचा आकांत कसा वर्णन करूं. पुत्र विश्वासराव आणि बंधु भाऊसाहेब यांच्या अवसानाचा स्वारीच्या मनावर एवढा परिणाम झाला कीं विचारूं नका. त्या थोर पुरुषाचं सारं मनःस्वास्थ्य बिघडून गेलं. त्याला अक्षरशः भ्रम झाला. भाऊ–भाऊच्या किंकाळ्यांनीं लहानथोरांची अंतःकरणं विदीर्ण झाली. माझी वीट न् वीट हादरली. प्रत्यक्ष दगडाला पाझर फोडील असा तो पुत्रशोक आणि बंधुशोक–मी त्यानंतर कधींच पाहिला नाहीं–आणि देवा–तसा तो पाहाणं नकोहि ! १८ जून १७६१ रोजीं स्वारीचं अवसान झालं.

पण या पेक्षाहि काका काका मला वांचवा–ही तरुण नारायणाची किंकाळी अजून माझ्या कानीं घुमतेय. कधींकाळीं तुम्हीहि एकाद्या मध्यरात्रीं इथं फेरी टाकलीत तर तुम्हालाहि ती किंकाळी ऐकूं येईल. सुमेरसिंग, खरकसिंग आणि मुहंमद इसब या तीन बेइमान गारद्यांनीं माझ्या डोळ्यादेखत या १८ वर्षाच्या कोंवळ्या आणि निरपराधी पेशव्याचा खून केला.

धन्याच्या रक्ताच्या चिळकांड्या माझ्या शरीरावर उडाल्या–थोरल्या बाजीराव पेशव्यांच्या वास्तव्यानें पुनीत झालेलं माझं शरीर अपवित्र झालं.

नारायणरावांच्या मृत्यूनंतर महाराष्ट्राचे ते थोर बुद्धिमंत मुत्सद्दि नाना फडणीस पुढें सरसावले आणि त्यांनीं बारभाईचं कारस्थान यशस्वी करून मराठी राज्याची कोसळती इमारत सावरून धरली. पुन्हा मराठी सत्तेला ते आनंदाचे आणि वैभवाचे दिवस येणार कीं काय असं वाटूं लागलं. बहाद्दर महादजी शिंद्यानं तर दिल्लीच्या तक्तावर मराठी सत्तेचें शिक्कामोर्तब केलं आणि संगमावर दरबार भरवून दिल्लीच्या सनदा पेशव्यांना अर्पण केल्या. आणि त्याच काळांत म्हणजे मार्च १७९५ मध्यें खर्ड्याची लढाई झाली. आणि मराठे वीरांनीं निजामाला अक्षरशः जमीनदोस्त केलं.

पण दिवा विझण्यापूर्वी मोठा होतो असं म्हणतात तें खोटं नाहीं. मराठी सत्तेचे प्रमुख आधारस्तंभ म्हणजे हरिपंत फडके आणि महादजी शिंदे यांचे निधन झालें.

—पण हें कांहींच नाहीं. यापेक्षांहि एक भयंकर प्रसंग मी माझ्यासमोर घडलेला पाहिलाय. आणि तो म्हणजे सवाई माधवरावांचा मृत्यु. २४ ऑक्टोबर १७९५ यादिवशीं पेशव्यांनीं भ्रमांत गणपतीच्या दिवाणखान्याच्या दुसऱ्या मजल्यावरून दक्षिणेकडे कारंज्याचे हौदांत उडी टाकली. खरोखर मला हात असते तर हा तो अनर्थ मी टाळला असता. कारण पेशव्यांची ती आत्महत्त्या म्हणजे मराठे साम्राज्याची इमारत पूर्णपणें ढासळल्याची खूण होती.

सवाई माधवरावांचा मृत्यु हा माझ्या मनावर झालेला मोठाच आघात. तें भग्नाण दृश्य अजून माझ्या डोळ्यासमोरून जात नाहीं. आणि त्या दिवसापासून मराठेशाहीला जी उतरती कळा लागली ती कायमचीच. नारायणराव पेशवे आणि सवाई माधवराव यांच्या रक्तसिंचनाचें प्रायश्चित्त मला लवकरच घ्यावें लागलें. १८१२ आणि १८१३ मध्यें अग्नीनें मला वेचिराख करून माझी शान् नष्ट केली. आणि त्यानंतर अवघ्या चार वर्षांच्या आंतच म्हणजे १७ नोव्हेंबर १८१७ रोजीं रॉबर्टसन् या साहेबानें माझ्या माथ्यावर इंग्रजी निशाण फडकावलें. साहेबानें तर माझा मुखभंग करायची प्रतिज्ञाच केली होती. श्रीमंत पेशव्यांच्या वास्तव्यानें पवित्र झालेल्या माझ्यासारख्याचे यापेक्षांहि आणखी धिंडवडे निघायचे होते त्यामुळें स्वातंत्र्याचा महामंत्र जेथें गायिला गेला, तेथें पारतंत्र्याची भुतें नाचूं लागलीं. १८२१ मध्यें माझें तुरुंगांत रुपांतर करण्यांत येऊन माझ्याच देशबांधवांना बंदिस्त करण्याची बदमाषी माझ्यावर लादली. या अपकृत्याच्या जबरदस्तीमुळें खरंच मी भ्रमिष्ट झालों आणि त्यामुळेंच कीं काय माझ्या आवारांत १८२५ मध्यें वेड्याचें इस्पीतळहि उघडण्यांत आलें.

यापेक्षां ती अवमानित अवस्था कोणती. अशा परिस्थितींत मला जगणं मुष्किल झालं पण अग्निनारायण माझ्या सहाय्याला हांकेसरसा धावून आला आणि १८२८ सालीं माझी तटबंदी सोडल्यास त्यानें पेशव्यांच्या पराक्रमाची कोणतीच नांवनिशाणी शिल्लक ठेवली नाहीं.

अशाच भग्नअवस्थेंत कांहीं वर्षे गेलीं. सर्वत्र अंधार माजला होता. माझ्या अंवती भोंवती तर रान वाढलें—आणि मराठ्यांचा तो तेजस्वी इतिहास महाराष्ट्र साफ विसरून जाणार कीं काय आणि आणि जन्मभर अशीच गुलामगिरी राहाणार कीं काय याचं मला भय पडलं.

पण हेहि दिवस जायचे होते. १८४९ सालीं लोकहितवादी–यानंतर महात्मा फुले, न्यायमूर्ति रानडे यांच्यासारख्या महान् विभूतींचें मला दर्शन घडलें. गोपाळ गणेश आगरकरांची समाजसुधारणेची तळमळ आणि त्याच वेळीं विष्णुशास्त्री चिपळूणकरांची स्वाभिमानपूर्वक मायभाषेची सेवा यामुळें महाराष्ट्रांत एक नवचैतन्य निर्माण झालेलं मी पाहिलं. आणि त्याच मागोमाग लोकमान्य टिळकांची–'स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे' ही सिंहगर्जना ऐकून माझ्या अंगीहि रोमांच उभे राहिले. पहिल्या बाजीराव साहेबांच्या पराक्रमाची याद यावी असाच तो काल होता. त्यानें सारा भारत खडबडून जागा झाला आणि त्यानंतर बापूजींच्या नेतृत्वाखालीं पुढें टाकलेल्या सत्याग्रही महाराष्ट्राचें नवें रंगरूप पाहून माझ्या नेत्रांचें पारणें फिटलें. अहिंसात्मक क्रांति ही माझ्या-

(पान ५२ वर चालू)



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास






"स्वर्ग जर कोठें असेल तर तो येथें आहे! येथें आहे!" अशीं ईर्षा मोंगल सम्राटांनीं या किल्ल्याबाबत बाळगलीं. मोंगल साम्राज्याचे चढ-उतार यानें पाहिले आणि परकी राजसत्तेचा बेगुमान दिमाखहि मुकाट सहन केला. याच लाल किल्ल्यावर स्वातंत्र्याचीं प्रतिष्ठापना करण्याचं नेताजींचं मनोमन स्वप्न होतं. "चलो दिल्ली" या घोषणेनें सारा आशिया निनादला. पण नेताजींच्या पादस्पर्शानें पुनीत होण्याचं भाग्य लालकिल्ल्याच्या नशिबीं नव्हतं. या कमनशिबी किल्ल्याचें मनोगत **अ. सी. केळूसकर** यांनीं कथन केलें आहे.—



# लाल किल्ल्याचे मनोगत

स्वतंत्र भारताचा अशोक-चक्रांकित तिरंगी झेंडा माझ्या उंच बुरुजावरून फडकला. सर्व राष्ट्र-वीरांनीं त्याला अभिवादन केलं. लक्षावधि टाळ्यांचा एकच गजर झाला. 'जय हिंद!', 'नेताजी सुभाषचंद्र बोस जिंदाबाद!!'

माझी फत्तराची छाती; पण ती देखील भरून आली. माझ्या अंगाच्या प्रत्येक कणा-कणांतून स्फुल्लिंग उडाले. यमुनेच्या काळ्या पाण्याला देखील गुलाबी रंग चढला! यमुनेच्या आरशांत मी आपलं रूप पाहिलं. मला तें तेज कांहीं आगळंच वाटलं!

माझा तो आनंद फार काळ टिकला नाहीं. भारतीय स्वातंत्र्याचा तो पहिला दिवस खरा, पण कां कुणास ठाऊक, माझा आनंद झरझर विरत गेला. पाऱ्याप्रमाणं त्यानं माझ्या अंतःकरणाला जडत्व दिलं अन् पाऱ्या-प्रमाणंच तो उडून देखील गेला.——एखाद्या स्मृतिपक्षाप्रमाणं! जो जगाच्या अक्षर साहि-त्यांत 'फिनिक्स' या नांवानं ओळखला जातो, अन् जो आपल्या राखेंतून जिवंत होऊन बाहेर येतो!

स्वातंत्र्याच्या होमकुंडांतून भारताचं हें स्वातंत्र्य सोन्याप्रमाणं शुद्ध होऊन आज बाहेर पडलं आहे. लक्षावधी हुतात्म्यांच्या रक्ताच्या अभिषेकानं तें पवित्र झालं आहे. लागण्यासारखंच हें स्वातंत्र्याचं बाळ आहे. अन् आज तें प्रथमच माझ्या अंगा-खांद्यावर खेळत आहे.

पण माझ्या अंगाखांद्यावर खेळणारं हें पहिलंच बाळ आहे का? अशीं किती बाळं माझ्या अंगाखांद्यावर खेळलीं! किती बाळांनीं माझ्या अंगणांत मोठे पराक्रम केले! किती बाळं माझ्या कुशींत अखेर विसावलीं!

आज माझं जीवन सर्वतोपरी उध्वस्त झालं आहे. गेल्या तीनशें वर्षांत माझी किती रूपं पालटलीं तें माझं मलाच ठाऊक नाहीं. अर्थात् मी बाहेरून पालटलों नाहीं, परंतु आंतून माझ्यांत हा किती बदल झाला आहे! माझी जडणघडण करण्यासाठीं त्या शहाजहान बादशहानं अक्षरशः कोट्यावधी रुपये पाण्यासारखे खर्च केले!

मला नांव ठेवण्याचा तो पहिला दिवस आठवतो. माझी जडण घडण होत असतां, बादशहा तिकडे काबूलमध्यें लढाई करण्यांत गुंतला होता. आग्र्याला राजधानी असतांना त्याच्या राज्याला अकरा वर्षें शत्रूंचा वेढा पडला होता. तिथं राजधानी ठेवणं धोक्याचं आहे हें त्याला पटलं होतं. त्याचे राज-ज्योतिषी नि शाही हकीम मुद्दाम दिल्लीला आले नि त्यांनीं आजची ही जागा पसंत केली!

माझे शिल्पकार होते मक्रमतखान. त्यांनीं नि त्यांच्या कारागिरांनीं माझ्या निर्मिती-मध्यें जरा देखील कसूर केली नाहीं. माझी ते अप्रतीम अष्टकोनी वास्तु पाहून बादशहा फार खूष झाला. नऊ वर्षांत आपल्या कारागिरांनीं अक्षरशः स्वर्ग पृथ्वीवर आणला असं त्याला वाटलं!

अन् बादशहानं शाही इतमामानं माझ्या अंतःकरणांत प्रवेश केला तो दिवस केवढा मोठा भाग्याचा होता!—शहाजादा दारा शिकोह यानं त्याच्यावर चांदी-सोन्याच्या मुद्रांची अक्षरशः खैरात केली. अन् बाद-शहानं देखील सर्वांना उंची नजराणे देऊन त्यांचे मान राखले. त्यानं आपल्या बेगमेला एक लाख रुपये इनाम दिले. शहाजादा दाराच्या अंगावर मानाचीं वस्त्रं चढवलीं, रत्नखचित हत्यारं नजर केलीं. अन् त्याला १२ हजारांवरून सोळा हजारांच्या घोड-दळाचा मनसबदार बनविलें. अशा रीतीनं बादशहानं अनेकांना अनेक जातींचे किंमती नजराणे त्यांच्या योग्यतेप्रमाणें दिले.

बादशहा शहाजहान त्या वेळीं मयूर सिंहासनावर बसला होता. सोन्या-चांदीनं मढवलेलं अन् विविध जातींच्या रत्नांनी नटलेलं असं तें सिंहासन होतं. असं सुंदर नि किंमती सिंहासन यापूर्वी कधीं कुणी पाहिलं नव्हतं. ज्यांना त्या सिंहासनावर बसण्याचं भाग्य लाभलं ते धन्य होत!

मला आज तो दिवाण-ई-खासमधील सोहळा आठवतो. त्या सिंहासनावर एक लाख रुपये मोलाचं किनखापी छत उभारण्यांत आलं होतं. ते सोन्या-चांदीच्या खांबावर आधारलेलं होतं. हें छताचं कापड खास अहमदाबादच्या कारखान्यांत तयार झालं होतं. हें छत सत्तर फूट लांब नि ४५ फूट रुंद होतं. छताला हिरे माणकं लावलीं होतीं. त्या छताच्या झालरीचं रेशमी नि मखमालीचं कापड चिन, तुर्कस्थानमधून आणलं होतं. ठिकठिकाणीं नक्षी काम केलेलीं चिनी मातींच्या भांड्यांची खास आयात करण्यांत आली होती. अमीर-उमरावांसाठीं खास आसनं तयार करण्यांत आलीं होतीं. त्यावर काश्मीरी गालिचे अंथरण्यांत आले होते.

अशा त्या आलिशान दिवाण–ई–खासमध्येंच तो 'नहर–ई–बहिश्त'चा म्हणजे स्वर्गीय कालव्याचा बगीचा होता. त्या बगीच्यांत सुंदर नि सुगंधी फुलाचे ताटवे होते. भारतांतील दुर्मिळ फुलांची मशागत त्या ठिकाणीं करण्यांत आली होती. कालव्यांतून यमुनेचं पाणी खेळविण्यांत आलं होतं. अन् त्या पाण्याला अत्तराचा वास येत होता.

जणूं काय स्वर्गच त्या ठिकाणीं निर्माण करण्यांत आला होता. जगांत कुठं स्वर्ग असेल तर तो या इथं आहे, असं कवि मुक्त कंठानं गात असत. हें वैभव पाहून परदेशी पाहुणे तर अचंबाच करीत असत.

अहाहा, काय तें वैभव! दरबार भरला आहे. सर्व मोंगल वैभव आज इथं पणाला लावलं आहे. नौबत खान्यामध्यें मंगल वाद्यें वाजत आहेत. अन् दरबाराचं काम सुरू होत आहे.

ते पहा अरबी घोडे थयथय नाचत आहे. त्यांचा नोकझोक पाहून घ्यावा. अशीं उमदीं जनावरं कुणी कधीं पाहिलीं नसतील. ते पहा, बादशहाला कुर्निसात करून निघून गेले. अन् हे कोण आहे, तुतारी फुंकीत?—हे हत्ती!—पहा कशी त्यांचीं शरीरं चकाकत आहेत अन् हीं त्यांच्या अंगावर रेशमी मखमलीचीं वस्त्रं तरी किती उंची आहेत. वा! वा!—हत्तींच्या या सोंडी नि गंडस्थळ किती सुंदर रंगविल्या आहे. या दोन लाल रेषा हत्तीच्या सोंडेवर किती शोभून दिसतात. अरे वा, त्यांच्या गळ्यांत चांदीच्या घंटा देखील आहेत! अन् हें कानाजवळ काय? हो याकच्या शेपटाच्या चवऱ्या! तें पहा अन् या हत्तींच्या दोन बाजूंनीं हीं दोन चिमुरडीं चाललीं आहेत? हत्तींचीं पिलं वाटतं? वा! या मेळाव्यांत तीं किती शोभून दिसतात!

तो पहा अग्रभागीं असलेल्या हत्तीनं एक पाय चांकवून नि सोंडेची तुतारी फुंकून बादशहाला तसलीम केलं!

हत्तींचा काफिला गेला, अन् त्यांच्या मागून हें कोण आलं? हो!–सांबरांचा तांडा. पहा कशी दुडक्या चालीनं पण मान उंच करून येत आहेत. यांची मान कशी ताठ, पहाणं कसं रुबाबाचं. अन् आतां आल्या या नीलगाई. किती चिमुकल्या, किती सुंदर!–अन् त्यांच्या मागून आलेले हे बंगाली गवे पहा किती अजस्र आहे. हो, हो, अन् हे कोण? शिकारी चित्ते नि शिकारी कुत्ते!—खास उझबेगमधले!—

गेलं!–तें सारं वैभव गेलं!–त्या वैभवाला पहिला तडाखा नादिरशहानं १७३९ सालीं दिला. उन्मत्त नादिरशहानं ३००० फूट लांब आणि १८०० फूट रुंद अशा या अष्टकोनी वास्तुमध्यें अक्षरशः थैमान घातलं. त्यानं दिल्ली अक्षरशः लुटली!—ज्याची किंमत करतां येणार नाहीं असं तें मयूर सिंहासन तो आपल्याबरोबर घेऊन गेला.—शहा आलम बादशहा!—गुलाम कादीरनं त्याचे डोळे पूर्वीच काढले होते म्हणून बरं झालं–नाहींतर दिल्ली लुटली जात असलेली, आपले नहर-ई बाहिश्त, हमाम बाग, रंगमहल, मुमताज महल, मेहताब बाग, हयातबक्ष बाग, उध्वस्त झालेलीं पाहून त्यानं तडफडून प्राण सोडला असता!

नादिरशहानंतर मोगल सलतनतीला तडाके बसत गेले. १७५७ नि १७५९ सालीं अहमदशहा दुराणीनं दिल्लीवर स्वारी केली. दिल्लीवर स्वारी म्हणजे माझ्यावर स्वारी. कारण सगळी दिल्ली माझ्यांतच सामावलेली होती. यमुनेच्या बाजूनं ६० फूट उंच नि जमिनीच्या बाजूनं ११० फूट उंच अशी माझी अभेद्य तटबंदी नि ७५ फूट रुंद नि ३० फूट खोल असा त्या भोंवतालचा खंदक त्यांच्या सैनिकांना अभेद्य वाटला नाहीं. त्यांनीं दिल्ली लुटून फस्त केली! बादशहाच्या एका शहाजादीला तो आपली बेगम बनवून निघून गेला!

अहमदशहा दुराणी गेला नाहीं तोंच मराठे माझ्या वास्तुमध्यें घुसले. त्या सदाशिवराव भाऊनं तर माझं तक्त नि तक्तपोशी दोन्ही फोडलीं. ३९ लाख रुपये किंमतीची सोना–चांदी त्याला मिळाली!

तो सारा!–सारा इतिहास मला आठवतो. अंतःकरण व्यथित होतं. अन् तो शेवटचा मोगल बादशहा दुसरा बहादुरशाह. १८५७ सालच्या क्रांति युद्धांत बंडखोर नि ब्रिटिश यांनीं त्याची काय दुर्दशा केली! मला तें सारं आठवतं. 'ज्या बंडखोरांनीं त्याला हिंदुस्थानचा बादशहा बनवलं त्याला त्यांनी 'अर

( पान ४९ वरून चालू )

सारख्याला तर नवीनच होती. पण तिचं सामर्थ्य कसं असतं याची प्रचीती मला आली.

आणि त्यामुळेंच तो सोनियाचा दिवस उजाडला. 'वंदेमातरम्' ची जयघोषणा अखेर १५ ऑगस्ट १९४७ ला सार्थ झाली. पारतंत्र्याची बंधनं तटतटां तुटलीं आणि माझा देश स्वतंत्र झाला. स्वर्गांत छत्रपति शिवाजी महाराज, बाजीराव पेशवे आणि थोरले माधवराव यांच्या आत्म्यांना किती धन्य धन्य झालं असेल या कल्पनेनें मी बेहोष झालों!

आणि हीच बेहोषी मी पुनरपि १ मे १९६० रोजीं अनुभवली. कारण त्या दिवशीं सारे मराठे एक झाले आणि शिवप्रभूंचा मराठ्यांनीं मोकळ्या मनानें जयजयकार केला.

—अखेर माझ्या जीवनाचं सार्थक झालं. आतां यापुढं भावी पिढीला आपला पूर्वेतिहास किती ज्वलंत होता याची साक्ष देणं आणि त्याच्या भावी प्रगतीला आशीर्वाद देणं हीच माझ्यासारख्या ऐतिहासिक वास्तुच्या जीवनाची इतिकर्तव्यता.

"जय महाराष्ट्र!"








बादशहा !' 'ए बुढ्ढ्या !' असं म्हणून हिणवावं ! वाटेल त्यानं यावं अन् त्या ९४ वर्षांच्या शाही पुरुषाची सफेत दाढी धरून त्याला गदगदा हालवावं ! गोऱ्या सोजिरांनीं चक्क राजवाड्यांत घुसावं, राणी वशांत जावं नि बेगमांशी छेड काढावी !—या अल्ला !–या खुदा !—केवढा नामुष्कीचा तो प्रसंग ! भांडखोरांनी तोफा डागून नि ब्रिटिशांनीं त्या चालवून मला बेजार केलं होतंच–२८ लाख मोलाचा माझा शाही महल उध्वस्त झाला होता, साडेपांच लाखांचा इमतिहाझ महल जवळ जवळ जमीनदोस्त झाला होता, चौदा लाखांचा दिवाण-ई-खास आतां एक भग्नाव-शेष राहिला होता. मोती महल नि शहाबुर्ज तर केव्हांच खतम झाले होते ! माझ्या अंगावर असंख्य ओरखडे नि अनंत भेगा पडल्या होत्या !

माझ्या आयुष्यांतला तो अत्यंत करुण काळ होता. ११ मे १८५७ पासून तो सप्टेम्बर अखेरपर्यंत मी जें भोगलं त्याची आठवण झाली कीं, आज देखील माझं अंग कसं थरथरतं ! विचारा बादशहा माझा आश्रय सोडून हुमायूनच्या कबरस्तानामधें लपून बसला होता. त्याला हडसनसाहेबानं पकडून आणलं नि त्याची या राजवाड्यांत शोभा केली !—त्याचे दोन बेटे मिर्झा मोगल नि मिर्झा किशोरे नि नातू अबू बरक यांना माझ्या डोळ्यादेखत गोळ्या घालून ठार मारलं. अन् त्यांची प्रेतं कोल्ह्याकुत्र्यांनीं खाण्यासाठीं रस्त्यावर फेंकून दिली ! खुद्द ब्रिटिशांनीं देखील नंतर त्यांच्या त्या कृत्याचा निषेध केला !

मला आठवत नाहीं, कीं माझी भूमि किती माणसांच्या रक्तांनी नहाली आहे !—इथं या झाडासमोर शेंकडों युरोपियन बायका-मुलांची कत्तल बंडखोरांनीं केली. हा वृक्ष आतां जुनाट झाला आहे. पण या किल्ल्यांत असे शेंकडों वृक्ष होते. जिथं शेंकडों लोकांना कंठस्नान घालण्यांत आलं ! इथल्या प्रत्येक इमारतीला इतिहास आहे. इथल्या प्रत्येक दगडाला इतिहास आहे. पण त्या इतिहासाची दखल कुणी कधीं घेतली आहे काय ?

भारताच्या स्वातंत्र्याच्या संग्रामांत १८५७ सालच्या क्रांतिवीरांनीं माझी आठवण ठेवली त्यांना माझी व वास्तु एक मोठं स्फूर्तिस्थान वाटलं. सत्तेचं मोठं केंद्र वाटलं !

पण नंतर माझी कुणी कधीं आठवण काढली का ? ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं दिल्लीचा विस्तार वाढविण्यासाठीं माझ्या शरीराची चिरफाड केली ! सलिमगट दरवाजाजवळचा पूल पाडला गेला; तिथं रेल्वेचा पूल आला, माझं रूप पालटून गेलं. पण कुणी तक्रार केली नाहीं. याच दरवाजांतून १९११ सालीं ब्रिटिश बादशहाची मिरवणूक केली तो कालपरवांचा इतिहास कुणाला आठवत नाहीं. त्यांनीं माझी प्रत्येक वस्तु बदलण्याचं ठरविलं. माझ्या मुमताजमहालाचं 'म्युझियम'-मध्यें रूपांतर झालं. लष्कराची इथं छावणी झाली. पोलो ग्राऊंड तयार झाला.

अशा रीतीनं मी झपाट्यानं बदलत चाललों होतों, पण भारतीयांनीं माझ्याकडे कधीं लक्ष दिलं नाहीं. भारताच्या स्वातंत्र्याचं मी स्फूर्तिस्थान आहे, याची आठवण त्यांच्यापैकीं एकालाहि कधीं झाली नाहीं. मला फार दुःख झालं. आपल्या हयातीमध्यें आपल्या जवळच्या माणसांनीं आपल्याला विसरून जावं, यासारखं दुःख नाहीं !—माणसाला त्याचं वैभव सोडून गेलं, कीं जवळचे देखील दूर जातात, तसंच असतं माझ्यासारख्या ऐतिहासिक वास्तुचं. तीं प्रवाशांच्या दृष्टीनं प्रेक्षणीय स्थळं असतात अन स्वकीयांच्या दृष्टीनं उपेक्षेचीं ! माझ्या वैभवाचं कोडकौतुक परदेशी मुशाफिरांनीं केलं. अनेकांनीं माझ्यावर पुस्तकं लिहिलीं. कांहींनीं कवणं रचलीं. पण माझ्या बांधवांना कधीं असं वाटलं नाहीं, कीं माझा इतिहास एकदां लिहून काढावा ! मी माझ्या मनाला म्हणालों मना ऊन पावसांत असाच कुढत रहा !–तुझे देशबांधव तुला विसरून गेले आहेत. त्यांना तुझ्या इतिहासाचा विसर पडला आहे. तुझ्या वैभवाची त्यांना कल्पना नाहीं. ती कल्पना फक्त यमुनेच्या पाण्याला आहे. कृष्णाच्या वेळेपासून या यमुनेनं प्रत्येक बारीक सारीक गोष्टीची नोंद केली आहे. गंगा भारताची पवित्र नदी असेल, तर यमुना भारताची इतिहास गंगा आहे ! तिच्याशीं तूं आतां गतजीवनाच्या गोष्टी बोलत बस. तुझ्या आठवणी तिला सांग, नि ती आपल्या आठवणी तुला सांगेल ! ती इतिहास गंगा अशीच वहात राहील. कुणी तरी इतिहासप्रेमी, इतिहास संशोधक येईल, अन् या तुझ्या गंगेंत तो अवगाहन करील. अन् मग साऱ्या जगाला तुझ्या पराक्रमाची कहाणी समजेल !

शेवटीं तो दिवस माझ्या आयुष्यांत उगवला. सर्व जग दुसऱ्या महायुद्धाच्या धुमश्चक्रींत सांपडलं होतं. अशा वेळीं माझी आठवण काढणारा एक तेजस्वी पुरुष निपजला. भारताच्या स्वातंत्र्यासाठीं तो या भूमींतून परागंदा झाला. जातांना तो माझी आठवण घेऊन गेला. अन् जेव्हां शहीद बेटांवर—त्या अंदमान बेटांवर त्यानं स्वतंत्र भारताचं पहिलं सरकार स्थापन केलं तेव्हां त्यानं माझं नामस्मरण केलं, 'चलो दिल्ली !— पुकारके कौमी झेंडा लहराके !' असं गीत गात त्याच्या सैनिकांनी भारताच्या दिशेनं कूच केलं. माझ्या छातीवर स्वतंत्र भारतीचं निशाण लावावं, नि तिथून भारताच्या स्वातंत्र्याची घोषणा करावी, अशी माझ्या त्या शूर बाल-काची इच्छा होती !

मी मोठ्या आशेनं त्याच्या वाटेकडे डोळे लावून बसलों होतों. तोंच एके दिवशीं कुणा-तरी दुष्टानं बातमी आणली,—भारताचा नेताजी, सिंगापूराहून टोकियोला जात असतां विमान अपघातांत निधन पावला ! धक्काच बसला मला त्या बातमीनें ! विश्वासच बसला नाहीं माझा ! !

त्यानंतरहि त्या तेजस्वी नेताजीचे ते शूर सैनिक मला ब्रिटिशांच्या पाशांतून मुक्त करण्यासाठीं भारताकडे कूच करीत निघाले. पण इम्फालच्यापुढें ते येऊं शकले नाहींत. तिथल्या रणांगणावर ते ब्रिटिशांच्या गोळ्यांना बळी पडले ! पण प्राण सोडतांना त्यांचे डोळे माझ्याकडे लागले होते !—ते मरतां मरतां आपल्या मागें राहिलेल्या बांधवांना म्हणाले—आमचं तोंड लाल किल्ल्याच्या दिशेनं ठेवा. आमचं उद्दिष्ट तें होतं. लाल किल्ल्यावर भारताचा तिरंगी झेंडा लावण्याचं ! तो झेंडा लावण्यासाठीं निघालेले ते शूर, अखेर ब्रिटिशांचे कैदी झाले. मला दुःख झालं पण ते कैदी म्हणून माझ्या अंगणांत आले तेव्हां मला त्या दुःखांतहि एक प्रकारचा आनंद वाटला !—त्या मेजर जनरल जगन्नाथराव भोसल्यांना पाहून मला महापराक्रमी तात्या टोपेची आठवण झाली.. त्या मराठ्याच्या







बच्चानं अखेर भारताची शान राखली. शिवाजी महाराजांचं नांव राखलं. त्या कर्नल धिल्लांना पाहून मला महापराक्रमी रणजितसिंगाची आठवण झाली. त्यानं शिखाचं नांव राखलं अन् त्या कॅ. शहानवाझला पाहून मला मोंगलाच्या पराक्रमाचा सारा इतिहास आठवला. दुसऱ्या बहादूरशहाच्या अपमानाचं उट्टं त्यानें काढलं असं मला वाटलं. त्या प्रेमनाथ सहगलला पाहून पंजाबच्या शूर वीरांची मला आठवण झालीं.--अन् ती वीरांगना लक्ष्मीबाई !—साक्षात् झांशीच्या राणीची आठवण तिनं करून दिली.

भारताच्या स्वातंत्र्यासाठीं झटणाऱ्या या वीरांना माझ्या वास्तूमध्यें सामान्य कैद्यांप्रमाणं आणण्यांत आलेलं पाहून, मला तात्या टोपेंच्या खटल्याचा तो प्रसंग आठवला. मनांत म्हणालो, अरे हे भारताचे स्वातंत्र्यवीर ! हे भारताचे शत्रू कसे ? भारताच्या स्वातंत्र्यासाठीं परक्या सत्तेविरुद्ध बंड पुकारण्याच अधिकार प्रत्येक भारतीयाला आहे !

हें कुणीतरी ओरडून परक्या सरकारला सांगावं असं मला वाटत होतं. अन् ती कामगिरी भुलाभाई देसाई यांनीं उत्तम रीतीनं पार पाडली ! माझ्या सुपुत्रांची सुटका झाली. मला आनंद झाला.

पण, माझा तो सुपुत्र कुठं होता ? ज्यानं भारतीयांना ब्रिटिश सत्तेविरुद्ध बंड पुकारण्याची स्फूर्ति दिली. भारताच्या शूर सैनिकांना ब्रिटिशांविरुद्ध बंड करण्याच आदेश दिला ?—

मला भेटायला अनेक लोक येतात. ते मला सांगतात—तुझा लाडका सुभाष भारताचा नेताजी विमान अपघातांत मरण पावला !–गेलीं तेरा वर्षे मी हें ऐकतों आहें. पण मला तें खरं वाटत नाहीं.

माझा सुभाष एक ना एक दिवस परत आल्याशिवाय रहाणार नाहीं. त्याच्या आयुष्यांत अनेक चमत्कार घडले आहेत. कधीच्या एकोणिसाव्या वर्षी संन्यास घेऊन तो हिमालयांत गेला. सर्वांना वाटलं, आतां तो कसचा परत येतो ? त्यावेळीं तो परत आला. तसाच तो परत येईल, या एकाच आशेवर मी त्याची वाट पहात या ऊन्हा-पावसांत उभा आहे. वर्षानुवर्षे उभा राहीन ! त्याच्या वाटेकडे डोळे लावून त्या मंगल आगमनाची वाट पहात बसणार आहे ! ! कधीं उगवेल का तो सुदिन ! ! !

• • •










*इतिहासकाळांतील लढाया नगरच्या किल्ल्यानें पाहिल्या. पण त्याचीं नोंद इतिहासकारांनीं फारशीं ठेवलीं नाहीं आणि जनतेलाहि त्याचीं याद राहिलीं नाहीं. पण याला प्रसिद्धि मिळाली ती ९ ऑगस्ट १९४२ रोजीं पं. नेहरू आणि त्यांचे सहकारी यांना बंदिस्त करण्याच्या बेईमानीमुळं. याचा हा पश्चात्ताप* **पु. रा. बेहेरे** *यांनीं वदवून घेतला आहे.*



# नगरच्या किल्ल्याची स्मरण सांखळी

माझें वय साडेचारशें वर्षांचें आहे. हजार हजार वर्षें वयाचे त्येक किकिल्ले महाराष्ट्रांत आहेत त्यांचें प्राचीनत्व व दीर्घ इतिहास मला नाहीं. माझ्यानंतर दीडशें वर्षांनीं बांधले गेलेलेहि कित्येक किल्ले आहेत. पण त्यांनीं जो स्वातंत्र्याचा इतिहास शिवशाहींत घडविला त्या पासूनहि मी वंचित आहे. माझ्या पासून जवळच असलेल्या देवगिरीच्या किल्ल्याची परंपरा आणि त्यांचें मोक्याचें स्थान मला नाहीं. तरीहि राष्ट्रीय अभिमानांचें स्फुरण चढेल अशा घटनांचा मी साक्षीदार आहे.

विसाव्या शतकांत किल्ल्याचें राजकीय आणि लष्करी महत्व शून्य झालें. पण माझें भाग्य असें कीं, त्या विसाव्या शतकांतच मला नवें राजकीय महत्त्व आलें. असा अद्वितीय योग लालकिल्ल्याखेरीज भारतांतल्या दुसऱ्या किल्ल्याच्या भाग्यांत क्वचितच आला असेल.

माझा जन्म एका नव्या राज्याच्या निर्मितीबरोबर झाला. दक्षिणेंतील बहामनी राज्याचे तुकडे पडून ज्या पांच शाह्या क्रमानें निर्माण झाल्या त्यांतील निजामशाहीबरोबर मी उभा राहिलों. निजामशाहीचा निर्माता अहमद निजामशहा यानें अहमदनगरची स्थापना केली, त्याचबरोबर माझी उभारणी झाली. नव्या बादशाहीची नवलाई आणि वैभव पहिलीं कांहीं वर्षें येथें झळकत होतें पण निजामशाही शंभर सवाशें वर्षेंच टिकली आणि निजामशाही शहाजीच्या घोड्यावर बसून आत्मसंरक्षणासाठीं रानोमाळ फिरूं लागण्यापूर्वीच माझें राजकीय महत्त्व संपुष्टांत आलें होतें;

त्यापूर्वीं शंभर वर्षें माझ्या बादशाही दिमाखाचीं गेलीं. त्यांत वैभवाचा दर्प होता, सात्विकता नव्हतीच, पण राजसपणाहि नव्हता. नुसतें तामसी, आसुरी वैभव. कपट कारस्थानें आणि विश्वासघात दुष्टपणा आणि द्वेष यांनीं त्यावेळीं वातावरण भरून गेलें होते. ज्यानें माझी पायाभरणी केली त्या अहमद निजामशहाची स्मृति अभिमानास्पद आहे. तो निजामशाहीचा संस्थापक उमदा होता. पराभूत होऊन आलेल्या सैनिकांनाहि बक्षिसें देऊन तो गौरवीत असे. पण इतिहासकाळांतील माझी सर्वांत स्फूर्तिदायक स्मृति आहे ती मर्दानी चांदबिबीची.

त्या राजभगिनीच्या दैवाचे दशावतार माझ्याच साक्षीनें घडले. विजापूरच्या पातशहाची राणी म्हणून तिचें लग्न झालें आणि विधवा होऊन ती परत आली. तिचें धैर्य अलोट होतें. निझामशाहीच्या पडत्या काळांत तिनें राज्य सांवरण्याचा आटोकाट प्रयत्न केला. बाहेर अकबर बादशहाचा मुलगा दख्खन जिंकण्याच्या ईर्षेनें चालून आला होता आणि आंत दौलतीचे कित्येक सरदार बेइमान होऊन कारस्थानें करीत होते. राजपुत्र अज्ञान लेंकरूं होतें. पण चांदबिबीनें सरदारांचा बंदोबस्त केला आणि सैन्याला धीर देण्यासाठीं ती स्वतः सैनिकी पोषाख घालून तटावर हिंडूं लागली.

मोंगलाच्या तोफांनी भडिमार करून माझ्या तटाला खिंडार पाडलें; पण या बहाद्दर बाईनें रातोरात तें खिंडार पुन्हां दगडांनीं बांधून काढलें. तिच्या शौर्यापुढें आणि चातुर्यापुढें शहाजादा मुराद नामोहरम झाला. पण अंतस्थ दुहीनें चांदबिबीचा घात झाला. कारस्थानें वाढत गेलीं आणि चांदबिबीला कैद करून माझ्याच आश्रयानें ठेवण्यांत आलें होतें. अखेर तिचा दुर्दैवानें खून झाला चांदबिबीच्या जीवनाशीं संबद्ध असलेले माझ्या दीर्घ जीवितांतील क्षण हें माझें अमोल धन आहे.

माझा उज्वल इतिहास चांदबिबी बरोबरच संपला असें मला वाटत होतें. कारण इतिहास झपाट्यानें घडत होता. महाराष्ट्राच्या भूमीवर मोठमोठ्या घटना घडून राहिल्या होत्या. पण मला त्यांत कांहीं स्थान नव्हतें. शिवशाही गेली, पेशवाई गेली, इंग्रजी आली. देह पडेपर्यंत उभें रहायचें एवढाच माझ्या जीविताचा अर्थ मी समजत होतों. इंग्रजी अमदानींत माझें उरलें सुरलें राजकीय महत्त्वहि संपुष्टांत आलें. उरलें तें एक पुराणवास्तु म्हणून कौतुक.

( पान ६० वर पहा )

*भारतांतील कारागृहें म्हणजे एका परीनें क्रांतीचे साथीदार. कारण क्रांति दडपून टाकण्यासाठीं ब्रिटिशांनीं या कारागृहांचा उपयोग केला. पण त्यामुळें क्रांतीची ज्वाला अधिकच भडकली. अलिपूरच्या कारागृहांत क्रांतीवीर कन्हैयालाल दत्त आणि सत्येंद्रनाथ बोस यांनीं मोठ्या कौशल्यानें पिस्तुलें मिळवून अलिपूर कटाच्या खटल्यांतील माफीचा साक्षीदार नरेंद्र गोस्वामी याचा वध केला. त्याची ही रोमांचकारी कहाणी* **त्र्यं. गो. अंदूरकर** *यांनीं सांगितली आहे.*



# का रा गृ हा च्या  भिं ती !

त्या वीर देशभक्ताची शेवटची ललकार ऐकिली—" वंदेमातरम् ! " आणि त्याचक्षणीं त्या अलिपूरच्या कारागृहांतून त्या वीर देशभक्ताला सहस्रावधी ' वंदे मातरम् ' च्या जयघोषाची साद मिळाली. तो वीर देशभक्त मेला पण अमर झाला. आज बावन्न वर्षें झाली ह्या घटनेला पण अजूनहि त्याची स्मृति या देशांतील लोकांना होऊं लागते. त्याला मारण्यासाठीं फांसावर लटकविलें खरें, पण तो मेला नाहीं. त्याचें नश्वर शरीर नष्ट झालें पण त्याची ज्वलंत देशभक्ति मेली नाहीं. ती तेवती वात तशीच तेवत राहिली आणि त्या मिणमिणत्या वातीनें मशालीचें स्वरूप धारण करून आग पेटविली. त्या आगींतून तावून सुलाखून निघालेलें हें आजचें स्वातंत्र्य आहे.

### कन्हैय्यालाल दत्त !

ज्याला फांसावर चढतांनाहि ' आतां मी कसा दिसतो ? ' अशी एका इंग्रज अधिकाऱ्याला पृच्छा करण्याची इच्छा व्हावी हे मोठे सूचक आहे. त्या इच्छेआड केवढें स्वाभिमानाचें, राष्ट्राभिमानाचें तेज तळपत आहे ! त्या इच्छेच्या द्वारां त्याला, त्या इंग्रजाला हेच दर्शवावयाचे होते कीं, भारतीय तरुण क्रांतिकारक देशस्वातंत्र्यांपुढें, स्वतःच्या प्राणाची यत्किंचितहि पर्वा करीत नसतो. तो आपला प्राण यःकश्चित समजत असतो.

श्री. कन्हैय्यालाल दत्त हे श्रीरामपूरचे राहणारे. लहानपणापासूनच त्यांचा देशभक्तीकडे ओढा होता. बी. ए. पर्यंत शिक्षण झाल्यावर ते श्री. बारिंद्रकुमारांच्या अनुशीलन समितीला येऊन मिळाले. तत्पूर्वी त्यांनीं देशस्वातंत्र्यासाठीं सर्व सनदशीर मार्ग चोखाळले होते. पण सनदशीर मार्गाला प्रतिस्पर्धी सज्जन राज्यकर्ता असावा लागतो. गांठ पडली होती ती पाशवी शक्तीच्या परकीय इंग्रज राज्यकर्त्यांशीं. तिथें सनदशीर मार्ग निष्प्रभ ठरले. तेव्हां श्री. कन्हैय्यालाल दत्त यांनी बंगालचे बॉम्ब युगाचे ब्रह्मदेव म्हणून मानल्या जाणाऱ्या श्री. बारिंद्र-कुमार घोष यांच्या 'अनुशीलन समिती' या गुप्त संघटनेचें सभासदत्व स्वीकारलें आणि फ्रेंच हद्दींतील चन्द्रनगर येथील अनुशीलन समीतीच्या शाखेचे काम ते पाहूं लागले. चन्द्रनगर हें फ्रेंच हद्दींतील शहर असल्यानें तेथें शस्त्रनिर्बंधाचा कायदा अस्तित्वांत नव्हता म्हणून तेथून कलकत्त्याच्या अनुशीलन समितीकडे चोरून शस्त्रास्त्रें पाठवि-ण्याची कामगिरी त्यांनीं आरंभिली. त्याचबरोबर अनुशीलन समितीला प्राणपणानें लढणाऱ्या तरुणांचाहि पुरवठा करण्याचें कार्य त्यांना करावें लागत असे. श्री. नरेंद्र गोस्वामी ह्या नांवाच्या एका तरुणाला त्यांनीच सशस्त्र क्रांतीची दिक्षा देऊन अनुशीलन समितीचे सभासद बनविले होतें.

### किंग्जफोर्डच्या वधासाठीं अहमहमिका

भारतीय देशभक्तांना, मनांत आकस धरून कठोर शिक्षा ठोठा-वण्यांत कलकत्त्याचे चीफ प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट मि. किंग्जफोर्ड हे आघाडीवर होते. त्यांनीं श्री. बारिंद्रकुमारांच्या ' युगांतर ' साप्ता-हिकाचे लागोपाठ सात संपादक कठोर शिक्षा ठोठावून कारागृहांत पाठविले होते. त्यांच्या या कठोर शिक्षेमुळें बंगाली तरुणांची माथीं भडकलीं होतीं; आणि मि. किंग्जफोर्डसाहेबावर सूड उगवून देश-बांधवांच्या कठोर शिक्षेचा बदला घेण्यासाठीं त्यांना उडविण्याचा एकदोन वेळां प्रयत्नहि करण्यांत आला होता; पण तो विफल झाला. तेव्हांपासूनच सरकारला त्यांच्या वधाची भीति वाटूं लागली होती. परंतु त्याकडे सरकारनें फारसें लक्ष दिलें नाहीं.











तेवढ्यांत श्री. सुशीलकुमार सेन या नांवाच्या अवघ्या पंधरा वर्षाच्या विद्यार्थ्यानें भर कोर्टांत वंदे मातरम्‌चा जयघोष केला म्हणून त्याचेवर पोलिसांनीं खटला भरला. आणि हा खटला नेमका मि. किंग्जफोर्ड यांच्याच कोर्टात सुनावणीला निघाला. बंगालमध्यें त्यावेळीं वंदे मातरम्‌ला बंदी होती तेव्हां आपल्या सरकारचा अवघ्या पंधरा वर्षाच्या विद्यार्थ्यानीं बंदीहुकूम मोडून अपमान करावा ही गोष्ट मि. किंग्ज फोर्ड साहेबांना कशी खपणार ? त्या विद्यार्थ्याच्या कोवळ्या वयाकडे लक्ष न देतां मनांत आकस धरून पंधरा फटक्यांची शिक्षा सुनावली आणि तिची अंमलबजावणीहि ताबडतोब करून घेतली. झाले ! ह्या प्रकारानें बंगाली क्रांतिकारक संतप्त झाले. त्यांच्या असंतोषाचा ज्वालामुखी दाहक तेज व्यक्त करूं लागला. त्याच्या गुप्त बैठकी भरूं लागल्या आणि किंग्जफोर्डला उडविण्याचा निर्धार करण्यांत आला. ह्या सर्व गोष्टींची अंधुकशी कल्पना सरकारला येतांच मि. किंग्जफोर्ड यांची कलकत्याहून सेशन जज्ज अशा बढतीच्या जागेवर मुझफरपूर येथें बदली करण्यांत आली. इतकेंच नव्हे तर मि. किंग्जफोर्ड साहेबांच्या संरक्षणाची सर्वतोपरी काळजी घेण्यांत आली. त्यांच्या बंगल्याभोंवतीं सशस्त्र पोलिसांचा खडा पहारा ठेवण्यांत आला. रिव्हालव्हरधारी शरीररक्षक त्यांच्याबरोबर देण्यांत आले. त्याच्या आवतीभंवती सशस्त्र गुप्त पोलिसांची सदैव टेहळणी चालू केली आणि किंग्जफोर्डहि आपल्या जिवाला इतका भिऊन होता कीं, क्रांतिकारकांकडून आपला वध होऊं नये म्हणून तो याखेरीज अन्य कोठेहि जात नसे. फारच झाले तर कधीमधी करमणुकीसाठीं तो युरोपियन क्लबांत जाई पण त्यावेळीं अधिक बंदोबस्तानें ! सरकारनें किंग्जफोर्ड साहेबांची बढतीच्या जागेवर बदली केली आणि त्यांच्या संरक्षणाची सर्व तऱ्हेची काळजी घेतली हे जणुं आपल्या जखमेंवर सरकारनें मीठ चोळले आणि एकप्रकारें त्यांच्या वधाचे आव्हानच दिले असें क्रांतिकारकांना वाटून त्यांचा दृढनिश्चयच झाला कीं, कोणत्याही त्यागाची पर्वा न करतां प्रसंगी फांसावर चढावे लागले तरी हरकत नाहीं पण किंग्जफोर्डचा वध हा करावयाचाच !

## चिठ्या टाकून वधाची कामगिरी सोपविली.

त्यासाठीं अनुशीलन समितीच्या सभासदांच्या रोज मध्यरात्रीं बैठका भरूं लागल्या. त्यावर उलटसुलट चर्चा सुरूं झाली. ह्या सर्व बैठकी माणिकतोळा बागेंत भरत असत. किंग्जफोर्डला उडविण्याच्या कामगिरीवर आपली नियुक्ति व्हावी अशी सभासदांत अहमहमिका सुरूं झाली. प्रत्येक सभासद संतप्त झालेला आणि प्रत्येकाला ती संधि आपल्याला मिळावी ही इच्छा. एकंदर वातावरण अत्यंत प्रक्षुब्ध झालेले. परिस्थिति अशा थरावर आली कीं, तीं आवरणें श्री. बारिंद्रकुमार यांना अशक्य झाले. पण त्यांना कोणाला नाखुष करणेहि अशक्य होते. अशा परिस्थितींत त्यांनी एक योजना पुढें मांडिली. सर्वांच्या नांवाच्या चिठ्या टाकून ज्याचें नांव पहिले निघेल त्यानें वधाची कामगिरी पत्करावी आणि ज्याचें नांव दुसरें निघेल त्यानें पहिल्याचे मदतनीस म्हणून त्या कामगिरीवर जावे. या योजनेला सर्वांनीं मान्यता दिलीं. सर्वांच्या नांवाच्या चिठ्या टाकण्यांत आल्या. पहिलें नांव निघाले ते श्रीरामपूरच्या नरेंद्र गोस्वामीचें आणि दुसरें नांव निघाले श्री. प्रफुल्ल चक्रवर्तींचें ! पण पहिलें नांव नरेंद्र गोस्वामीचें निघतांच प्रत्यक्ष वध करण्यास त्यानें कच खाल्ली. वधासारखें भीषण कृत्य करण्यास त्याचें मन धजेना. तो कुरकुर करूं लागला. ऐन वेळीं कच खाणारा नरेंद्र हा अखेर घातक ठरेल म्हणून समितीचा निर्णय अमान्य करणारास रशियन क्रांतिकारकांच्या सिद्धांताप्रमाणें प्राणदंडाची शिक्षा देणेंच योग्य म्हणून सर्व सभासदांनीं नरेंद्राला ठार करण्याची त्याच बैठकींत मागणी केली. तेव्हां तर तो अधिकच गयावया करूं लागला. जीवदानाची याचना करूं लागला. तेव्हां श्री. बारिंद्रकुमारांनीं त्याला जीवदान दिले. अखेर त्याच्या नांवाऐवजी नंतर मेदिनापूरचे श्री. खुदीरामजी बोस यांची किंग्जफोर्डच्या वधासाठीं नियुक्ति करण्यांत आली.

## अखेर किंग्जफोर्ड बचावला

श्री. खुदीराम बोस आणि श्री. प्रफुल्ल चक्रवर्ति हे दोघे किंग्जफोर्डच्या वधाच्या कामगिरीवर निघाले. त्यांनीं बॉम्ब, रिव्हॉल्वर्स इत्यादि साहित्य बरोबर घेतलें. किंग्जफोर्डचा एकंदर दिनकार्यक्रम काय याचाहि त्यानीं सुगावा काढला. मुझफरपुरांत तो कोठे जातो, केव्हां जातो वगैरे माहिती अत्यंत सावधगिरीनें मिळविली. तो ज्या गाडींतून जातो ती गाडीही कोणत्या रंगाची आहे हेहि पाहून ठेवले आणि दिनांक ३० एप्रिल १९०८ रोजीं सायंकाळचे सुमारास युरोपियन क्लबाकडून त्यांच्या बंगल्याकडे येणाऱ्या अगदीं त्यांच्या गाडीसारख्याच गाडीवर किंग्जफोर्डच त्यांत असणार अशा समजुतीनें बॉम्ब फेकला. परंतु त्या गाडींत सरकारी वकील मि. केनेडी यांची पत्नी आणि मुलगी होती. ती या बॉम्ब फेकीनें मरण पावली. ह्या दोघीं निरपराध होत्या. त्या मरण पावल्या आणि किंग्जफोर्ड मात्र त्या संकटांतून बचावला.

## कटाचा स्फोट ३६ जणांना अटक

दुसरे दिवशीं खुदीरामजी पकडले गेले. त्यांच्यावर पुढें खटला होऊन त्यांत त्यांना फांशीची शिक्षा झाली. परंतु ह्या प्रकरणानें सरकार हादरले. जागृत झाले. बंगालमध्यें सरकारी अधिकाऱ्यांचा खून करणारी योजनाबद्ध अशी एखादी संघटना असावी, मूल मोठा कट असावा अशी सरकारची खात्री होऊन चुकली. धांवपळ सुरूं झाली. झडत्या, अटक, संशयितांची धरपकड यांना ऊत आला. आणि त्यांतूनच माणिकतोळाबाग ही सशस्त्र क्रांतिकारकांची कर्मभूमी असून तेथें शस्त्रास्त्रांचा सांठा केला जातो असाहि सरकारला सुगावा लागला. तत्क्षणीं माणिकतोळाबागेची झडती घेण्यांत आली. कोपरान् कोपरा खणून काढण्यांत आला. त्या झडतींत अनेक बॉम्स, तलवारी, बंदुका, भाले, रिव्हॉल्व्हर्स इत्यादी वस्तु बरोबरच अनुशीलन समितीच्या ठिकठिकाणच्या शाखेंतील सभासदांच्या नांवाची एक यादीहि पोलिसांना आढळून आली. त्या मिळालेल्या सभासदांच्या नांवाच्या यादीवरून ठिकठिकाणच्या कार्यकर्त्या तरुणांना पकडण्यांत आले. आणि त्यांचेवर "अलिपूर कटाचा खटला" (याच खटल्याला कांहींजण माणिकतोळा बॉम्ब खटला असेंहि संबोधतात.) या नांवानें खटला भरण्यांत आला. या खटल्यांत सुप्रसिद्ध योगी बाबू अरविंद घोष यांनाहि गोवण्यांत आले होते. याशिवाय त्यांचे धाकटे







अनुक्रमणिका

बंधु श्रीं. बारिंद्रकुमार घोष, उल्लासकर दत्त, कन्हैय्यालाल दत्त, सत्येंद्र बोस, नरेंद्र गोस्वामी प्रभृती छत्तीस तरुणांना आरोपी करण्यांत आले होते.

## नरेंद्र माफीचा साक्षीदार झाला

ह्या पकडलेल्या आरोपींकडून कटाची माहिती मिळविण्यासाठीं पोलिसांनीं त्यांचा अनन्वित छळ केला. परंतु या छळापुढें श्री. नरेंद्र गोस्वामी टिकला नाहीं. त्यानें कटाची सर्व माहिती देण्याची कबुली दिली. पण तो माफीचा साक्षीदार होतांना आपल्याला बंधमुक्त करून ताबडतोब परदेशीं पाठविण्याच्या अटीवर! कारण त्याला ही भीति होती कीं, न जाणो आपण माफीचा साक्षीदार झालों म्हणून खटल्याच्या निकालानंतर कोणातरी क्रांतिकारांकडून आपला वध केला जाईल. आणि म्हणून त्यानें खटल्याचा निकाल होतांच आपणास परदेशीं पाठवावें अशी सरकारला अट घातली होती. अर्थात् सरकारनें ती मान्य केली आणि कटाची संपूर्ण माहिती काढून घेतली. तो जेव्हां माफीचा साक्षीदार झाला तेव्हां त्याला त्याच्या सहकाऱ्यांमधून बाजूला अत्यंत सुरक्षित अशा इंग्रजी पहारेकऱ्यांच्या संरक्षणांत ठेवण्यांत आले. नरेंद्र गोस्वामी याला क्रांतीची दीक्षा श्री. कन्हैय्यालाल दत्त यांनींच दिली असल्यामुळें नरेंद्राच्या या कृत्याची कन्हैय्यांला चीड आली. आपण ज्याला क्रांतीची दीक्षा देऊन आपल्या गुप्त संघटनेंत घेतले त्यानेंच अशी फितुरी करावी आणि स्वतःचा जीव वांचविण्यासाठीं आपल्या इतर सहकाऱ्यांच्या जीवावर उठावें याचा कन्हैय्याला विषाद वाटूं लागला. माफीचा साक्षीदार होऊन त्यानें पोलिसांपुढें कांहींही सांगितलें तरी खुद्द कोर्टांत त्याची साक्ष जोपर्यंत झाली नाहीं तोपर्यंत पोलिसांपुढें सांगितलेल्या गोष्टींना महत्व नाहीं म्हणून त्याची कोर्टापुढें साक्ष होण्यापूर्वींच त्याला कसा ठार करावा या विषयींची खलबतें त्याच्या सहकाऱ्यांत सुरू झालीं. दि. २३ जुलै १९०८ रोजीं श्री. नरेंद्र गोस्वामीची साक्ष कोर्टांत होणार असें प्रकट होतांच त्याला तत्पूर्वींच ठार करण्याची कन्हैय्यालाल दत्त आणि सत्येंद्र बोस या दोघांनीं हमी पत्करली.

## नरेंद्र भेटीला आला तेव्हां—

पण ही हमी पार पाडावी कशी हा त्यांच्यापुढें पेंचप्रसंग होता. वध करावयाचा म्हणजे रिव्हॉल्व्हर्स पाहिजेत ती कोठून आणावी? तुरुंगांत ती कशी मिळणार? पण इच्छा असली म्हणजे मार्ग सांपडतो ह्या म्हणीप्रमाणें त्यांना मार्गहि सांपडला. अलिपूरच्या कोर्टांत खटला ऐकण्यास आरोपींचे अनेक सहकारी येत असत. शिवाय नरेंद्र हा माफीचा साक्षीदार झाला ही गोष्टहि जाहीर झाल्यामुळें बाहेर असलेले क्रांतिकारक त्याच्यावर प्रक्षुब्ध झालेच होते. कोर्टांत खटला चालला असतांना कन्हैय्यालाल आणि सत्येंद्र बोस यांनी सर्वांची नजर चुकवून आपल्या बाहेरच्या सहकाऱ्यांना रिव्हॉल्व्हर पुरविण्याची नेत्रपल्लवीनें खूण केली. आणि एका रविवारीं त्यांच्या भेटीस आलेल्या सहकाऱ्यांनी दोन पिस्तुले मोठ्या सावधगिरीनें त्यांना आणूनहि दिलीं. पिस्तुलें मिळाली खरी पण आतां नरेंद्राला कसे गांठावें? तो तर हॉस्पिटल वार्डांत गोऱ्या शिपायांच्या सशस्त्र पहाऱ्यांत! पण त्यांवरहि त्या दोघांनी युक्ति काढली. आपण आजारी आहोंत असे ढोंग करून त्यांनी आपली हॉस्पिटलांत रवानगी करून घेतली. हॉस्पिटलमध्यें सत्येंद्राला माडीवर आणि कन्हैय्यालालला तळ मजल्यावर जागा मिळाली. सत्येंद्र आणि कन्हैय्यालाल या दोघांनीं नरेंद्राकडे निरोप पाठविला कीं, 'ह्या जंजाळांत आपण उगाच सांपडलो याचा आतां आपणास पश्चात्ताप होत आहे. शिवाय येथील छळहि आतां आपल्याला सहन होत नाहीं. तेव्हां माफीचा साक्षीदार होऊन या संकटांतून सुटावें असा विचार आहे तेव्हां माफीचा साक्षीदार होण्यासाठीं कोणत्या मार्गानें प्रयत्न करावा हे तूंच आम्हाला सांग आणि आम्हाला या संकटांतून सोडीव. आम्ही माफीचे साक्षीदार होण्याला तयार आहोत. तरी त्यासंबंधीं विचार करण्यासाठीं तुझी भेट आवश्यक आहे, तूं भेटीला ये."

## विश्वासघातक्याला हेंच प्रायश्चित्त!

हा निरोप मिळतांच नरेंद्राला आनंद झाला. आपण एकटेच माफीचे साक्षीदार झालो नसून आपल्याबरोबर आणखी दोघे माफीचे साक्षीदार होत आहेत हे सरकारला कळविले तर आपल्यावर सरकारची अधिक मेहरनजर होईल असा विचार करून त्यानें सत्येंद्र नि कन्हैय्या यांच्या भेटीची परवानगी काढली. त्याला सत्येंद्र नि कन्हैय्यांचे निरोप विश्वासार्ह वाटले. त्याला त्यांच्या भेटीची परवानगी मिळतांच तो गोऱ्या शिपायांच्या सशस्त्र पहाऱ्यांत सत्येंद्राच्या भेटीला आला. माडीवर त्या दोघांचे बराच वेळ बोलणें झाले. नरेंद्रांची नजर चुकवून उशाखालीं दडवून ठेवलेले रिव्हॉल्व्हर काढून सत्येंद्रानें एक गोळी झाडली. तत्क्षणीं "घात झाला मेलो-दगा-दगा" असें ओरडत नरेन्द्र माडीवरून खालीं आला. सत्येंद्राची गोळी त्याच्या पायाला लागली होती. नरेंद्र ओरडत खाली येतांच तापानें फणफणत असलेला कन्हैय्यालाल सावध झाला. त्यानेंहि आपल्या उशीखाली लपवून ठेवलेले रिव्हॉल्व्हर बाहेर काढले आणि पळत बाहेर येऊन नरेंद्रावर गोळी झाडली. नरेंद्र पळूं लागला तसा कन्हैय्यालालहि त्याचे मागें पाठलाग करीत रिव्हॉल्व्हर झाडीत धावूं लागला. नरेंद्राचा पहारेकरी हिटन यानें मध्यंतरी कन्हैय्यालालला पकडण्याचा प्रयत्न केला पण त्याचेवर गोळी झाडून तो निसटला आणि नरेंद्राचा पाठलाग करीत त्याचे मागें धांवूं लागला. 'मेलो मला वांचवा' अशा आरोळ्या तो ठोकीतच धांवत होता. पण कन्हैय्यालाल जवळचे भरलेलें रिव्हॉल्व्हर पाहून आणि त्याचा तो रुद्रावतार पाहून कोण पुढें येणार? जो तो आपल्या जीवाला भीत होता. नरेंद्र धांवत कार्यालयाकडे वळला. आतां मात्र तो आपल्या कचाट्यांतून सुटणार अशी शंका आल्यानें कार्यालयांतून त्याला मदत मिळण्यापूर्वींच त्याला ठार केला पाहिजे असा विचार करून कन्हैय्यालाल जोरानें धांवत त्याच्या जवळ गेला आणि सटासट गोळ्या झाडून त्यानें नरेंद्राला ठार केले. रक्ताच्या थारोळ्यांत तरंगत असलेल्या त्याच्या प्रेताला लाथ मारून कन्हैयालाल त्वेषानें उद्गारला, "निमकहरामी करून सहकाऱ्यांचा विश्वासघात करणाऱ्याला हेच योग्य प्रायश्चित्त!"

## कन्हैय्या-सत्येंद्राला फांशीची शिक्षा

नरेंद्राला ठार करून आपले काम फत्ते झाले हें आपल्या सहकाऱ्यांना कळावे म्हणून वंदे मातरम्चा त्रिवार जयघोष केला. कन्हैय्यालालचा तो जयघोष ऐकून त्याचे सहकारी आरोपी आनंदानें

नाचूं लागले. त्यांनीहि वंदे मातरम्‌चा जयघोष करुन कन्हैय्याला साद दिली. कन्हैय्यालालला पकडण्याचा अधिकाऱ्यांनी प्रयत्न केला पण पुढें होऊन त्याला पकडण्याचे धैर्य कोणाला होईना. तेव्हां कन्हैय्यालालनें आपल्या हातांतील रिव्हॉल्व्हर फेकून दिले आणि तो अधिकाऱ्यांना म्हणाला, "पकडा मला. माझे काम झाले. स्वतःचा जीव वांचविण्यासाठीं आपल्या सहकाऱ्यांच्या जीवावर उठलेला हा निमकहराम असाच कुत्र्याच्या मोतीनें मेला पाहिजे."

आणि मग त्याला पकडण्यांत आले. सत्येंद्रालाहि पकडण्यांत आले. या दोघांना त्यांच्या सहकाऱ्यांमधून बाजूला ठेवण्यांत आले. आणि अलिपूरच्या तुरुंगांतच त्या दोघांवर नरेंद्राच्या वधाचा खटला चालून दोघांनाहि फांशीची शिक्षा फर्मावण्यांत आली.

## माझ्याबरोबरच डिप्लोमाहि फांसावर चढवा

ह्या शिक्षेवर अपील करावें अशी इच्छा कन्हैय्यालालच्या आईनें आणि बंधू श्री. आशुतोष दत्त यांनीं प्रदर्शित केल्यामुळें कन्हैय्या-लालच्या बंधूंनीं-डॉ. दत्त यांनी तुरुंगांत त्याची भेट घेतली. तेव्हां कन्हैय्यालालनें त्यांना पहिला प्रश्न केला. 'फांशीचा दिवस निश्चित झाला काय?' त्यावर डॉ. दत्त यांनीं अद्याप फांशीचा दिवस निश्चित झाला नाहीं पण त्या शिक्षेवर अपील करावे अशी आईची इच्छा असल्याचे त्यानीं कळवितांच कन्हैलाला म्हणाला. अपील काय म्हणून? गुन्हा मी केला आहे. फांशी मला मंजूर आहे. अपील करण्याची मुळींच जरूरी नाहीं. मात्र एक करा. आईला भेटीला आणूं नका. कारण तिचे सांत्वन करणें माझ्या आटोक्या बाहेरचे आहे.' तेव्हां निराश होऊन डॉ. दत्त परत गेले. कन्हैय्यालालच्या फांशीचा दिवस दि. १० नोव्हेंबर १९०८ हा सरकारनें निश्चित केला. तेव्हां फांशीच्या आदल्या दिवशीं डॉ. दत्त हे पुन्हा कन्हैय्यालालला भेटायला गेले होते. त्यावेळीं तो बंगाली गाणें गुणगुणत कोठडींत येरझाऱ्या घालीत होता. 'काय, फांशीचा दिवस ठरला?' असा त्यानें डॉ. दत्त यांना सवाल केला. दुःखित अंतःकरणानें त्यांनीं 'होय उद्या फांशीचा दिवस आहे.' असें सांगतांच कन्हैय्या-लाल हंसला नि म्हणाला—"सुटलो एकदांचा या पारतंत्र्यांतून!" बी. ए. चा डिप्लोमा मिळाल्याचे डॉ. दत्त यांनीं सांगतांच कन्हैय्या-लाल हंसत हंसत म्हणाला-'मग माझ्या बरोबरच डिप्लोमाहि फांसा-वर चढवा.' डॉ. दत्त यांनीं तुझी अखेरची इच्छा काय आहे म्हणून पृच्छा केली तेव्हां कन्हैय्यानें "माझी कोणतीही इच्छा नाहीं. मी पूर्ण समाधानांत उद्या फांसावर चढणार आहे. आईला मात्र नीट जपा तिचे सांत्वन करा." असे त्यानें अखेर सांगितले. कन्हैयालालचे वडिल बंधु श्री. अशुतोष दत्त यानीं बंगाल सरकारकडे अर्ज करून कन्हैयालालचा अंत्यसंस्कार करण्यासाठीं त्याच्या प्रेताची मागणी केली. परंतु अंत्यसंस्काराला डॉ. दत्त, श्री. अशुतोष दत्त आणि दोन तीन नातलग एवढ्यांनाच परवानगीं देण्यांत आल्याचे त्यांना कळ-विण्यांत आले.

दि. १० नोव्हेंबर १९०८ रोजी पहांटे अलिपूरच्या कारागृहांत कन्हैय्याला फांशी देण्यांत आले. आदल्या दिवशीं रात्रीं तो बंगाली गीतें गात होता. तेव्हां तुरुंगावरील एक इंग्रज अधिकारी त्याला म्हणाला, 'कन्हैय्या, उद्यां तूं फांशी जाणार आणि आज तूं इतक्या उत्साहानें गाणीं गातोस. हंसतोस?' त्यावर कन्हैय्या नुसता हंसला. फांशीला जातांना तो पूर्ण आनंदी दिसत होता. त्याच्या चेहऱ्यावर समाधानाचे तेज दिसत होतें. त्यानें वधस्तंभावर चढल्यावर डोळे मिटून घेतले आणि क्षणार्धांत तो ईश्वरचरणीं विलीन झाला.

एक तास त्याचे प्रेत वधस्तंभावर लोंबकळत ठेवले होते. नंतर डॉक्टरी तपासणी झाल्यावर त्याचे प्रेत एका पांढऱ्या चादरींत गुंडाळून ठेवण्यांत आले होते.

## अहो असें रडता कां?

फांशीचा दिवस अगोदरच जाहीर झाला असल्यामुळें त्या दिवशीं पहांटेपासूनच अलिपूरच्या कारागृहाभोंवतीं लोकांची मनस्वी गर्दी झाली होती. कन्हैय्याच्या प्रेताची लोकांनीं मागणी केली. तो अफाट जनसमुदाय पाहून प्रेत देण्याचें नाकारणें सरकारला अशक्य झाले. तेव्हां प्रेत बाहेर घेऊन येण्यासाटीं डॉ. दत्त, श्री. अशुतोष दत्त आणि एक दोघे नातलग यांना तुरुंगांत जाण्याची परवानगी देण्यांत आली. कन्हैय्यालालचे प्रेत एका पांढऱ्या चादरींत गुंडाळलेलें होतें. ती चादर काढली तेव्हां कन्हैय्याच्या मुखावर कोणतीही विद्रुप कळा नव्हती. जणुं कांहीं तो शांत झोपल्यागत दिसत होता. हे पाहून आशुतोष दत्त, डॉ. दत्त रडूं लागले. तेव्हां तुरुंगावरचा तो इंग्रज अधिकारी म्हणाला, "असें रडतां कां हो? ज्या देशांत असे वीर युवक जन्म घेतात तो देश खरोखरीच धन्य होय. जो जन्माला आला तो मरणारच. पण अशाप्रकारें कितीशी माणसें मरत असतील? असे जरी तो इंग्रज अधिकारी त्यांचे सांत्वन करीत होता तरी त्याच्या डोळ्यांतून मात्र सारख्या अश्रुधारा वाहात होत्या. तो कन्हैय्याच्या प्रेताकडे टक लावून पाहात म्हणाला. तुरुंगांत कन्हैय्याचे नि माझे खूप बोलणें झाले. तो वीर पुरुष होता यांत शंका नाहीं. मी त्याला फांशीच्या आदल्या दिवशी म्हटले, 'कन्हैया, उद्यां तूं फांशी जाणार याचे तुला कांहींच दुःख होत नाहीं काय?' त्यावर तो हंसत म्हणाला—"दुःख? अन् ते काय म्हणून!" आणि असे म्हणून तो हंसत होता. "त्याला आपल्या जीविताची यत्किंचितहि पर्वा वाटत नव्हती. आणि दुर्भाग्यवशात् त्याच्या फांशीच्या वेळींही मी उपस्थित होतो. तो फांसावर चढला तेव्हां त्यानें आपले नेत्र मिटून घेतले होते. फांसाची दोरी कंठाभोवती लपेटली तेव्हां तो डोळे उघडून हंसत हंसत मला म्हणाला—'मिस्टर, मी आतां कसा दिसतो?' केवढें धैर्य त्याचे. मी तर स्तंभितच झालो."

## कन्हैय्याचा देवदुर्लभ सन्मान

श्री. आशुतोष दत्त, डॉ. दत्त प्रभृतींनीं कन्हैय्यालालचे प्रेत तुरुंगाबाहेर आणले तेव्हां त्या अफाट जनसमुदायांतून कन्हैय्याच्या नांवाचा जयघोष करण्यांत आला. त्याच्या शवावरील ती पांढरी चादर काढून जेव्हां लोकांना कन्हैय्याचे अंत्यदर्शन घडविण्यांत आले तेव्हां सर्वांच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहात होत्या. स्त्रिया तर धाय मोकलून रडत होत्या. कन्हैय्याला अत्तरानें स्नान घालण्यांत आले, त्यांच्या कपाळावर चंदनाचें गंध लावण्यांत आल्यावर एका गुलाबी काश्मीरी शालीचे त्याचेवर आच्छादन घालण्यांत आले. 'वंदेमातरम्' 'कन्हैय्यालाल की जय' अशा गगनभेदी जयघोषानें ते सारे वातावरण निनादत होते. आणि अशा जयघोषांतच कन्है-








त्याच्या प्रेतयात्रेला सुरुवात झाली. पावला-पावलावर त्याचेवर पुष्पवृष्टि होत होती. सकाळीं निघालेली ती मिरवणूक स्मशानांत पोहोंचायला दुपारचे चार वाजले. मिरवणुकींत ठिकठिकाणी कन्हैय्याच्या शवावर फुले, गंध गुलाल, बुक्का, बिल्वपत्र अगणित अर्पिली जात होती. उगाळलेल्या चंदनाचे गंध त्याच्यावर गुलाबपाण्याप्रमाणें शिंपडण्यांत येत होते. अत्तराचे सिंचन करण्यांत येत होते. लाखो लोकांची ती विराट मिरवणूक दुपारी ४ वाजतां स्मशानांत पोहोंचली. स्मशानांत अगोदरच चंदनाची चिता रचलेली होती. कन्हैय्याच्या देहाला पुन्हां अत्तर, चंदन चोपडण्यांत आले. हळद माखण्यांत आली आणि स्नान घालून त्याचा तो तेजस्वी देह चितेवर ठेवण्यांत आला. तत्क्षणीं स्त्रिया, मुलें यांच्या समुदायांतून रोदन ध्वनि लोकांची अंतःकरणें कापीत होता. कन्हैय्याच्या देहाला मंत्राग्नि देण्यांत आल्यावर त्या जमलेल्या लोक समुदायाकडून कन्हैय्याच्या चितेवर कळशी कळशीनें तुपाचा वर्षाव होत होता. सर्व दिवसभर चंदन काष्टें, तूप, अत्तराचीं तेलें चितानलांत पडत होती. कन्हैय्याच्या धैर्याचे, पराक्रमाचें गुणगान करीत तो अफाट जनसागर सूर्यास्तापर्यंत बसून होता. चिता शांत झाल्यावर कळशी कळशी जल आणून चिता संपूर्ण शांत केल्यावर कन्हैय्याच्या अस्थि शोधशोधुनहि मिळाल्या नाहींत तेव्हां त्याची रक्षा गोळा करून ती गंगेत अर्पण करण्यांत आली. कन्हैय्याची रक्षा मिळविण्यासाठीं लोकांची झुंबड पडत होती. स्त्रिया, मुलें, पुरुष ती रक्षा चिमुटभर जरी हाती लागली तरी स्वतःला धन्य समजत होती. ती रक्षा कोणी सुवर्णाच्या, कोणी चांदीच्या, कोणी चंदनाच्या तर कोणी हस्तीदंताच्या डबींत भरून त्याची नित्य पूजा करण्यासाठीं नेत होते. अशा रीतीनें त्या अफाट जनसमुदायानें कन्हैय्याचा देवदुर्लभ सन्मान करून त्याच्या विषयीची आपली आदरभावना प्रकट केली. कन्हैय्या आपल्या सहकाऱ्यांना वांचविण्यासाठीं नरेंद्राचा खून करण्याला प्रवृत्त झाला पण स्वतः फांसावर लटकला याचे जो तो कौतुक करीत मध्यरात्रीच्या सुमारास विव्हल अंतःकरणानें परतला.

नरेंद्राच्या प्रेताला उचलायलाहि माणूस मिळाला नाहीं पण कन्हैय्याला अफाट जनसागर प्रेतयात्रेला उपस्थित होता. ही परस्पर विरोधी दोन दृश्यें कलकत्त्याच्या नागरिकांना पाहावयाला मिळाली लोकाग्रणी कन्हैय्या मृत्यूनें अमर झाला. त्याला आमचे शतशः प्रणाम.

• • •

---

(पान ५५ वरून चालू)

पण इंग्रजी अंमदानींत मला अचानक एक भाग्य लाभलें. आणि नव भारताच्या स्वातंत्र्य युद्धांतील एक तीर्थक्षेत्र म्हणून माझी योग्यता ठरली. पहिल्या महायुद्धांत इंग्रजांनीं माझ्या तटायुरोपीय युद्धकैदी सुरक्षित ठेवले होते. दुसऱ्या महायुद्धांत भारतीय स्वातंत्र्याच्या सेनापतींच्या पद स्पर्शानें मी पावन झालों. नव भारताच्या भाग्यविधात्यांचा सहवास साडेतीन वर्षें मला लाभला. माझा पुनर्जन्म झाला. आणि मी अमर झालों.

दुसरें महायुद्ध पूर्वेंत आणि पश्चिमेंत शिगेला पोंचलें होतें. इंग्रजांच्या साम्राज्याच्या प्राण त्यागाचा समय आला तरीहि भारतीय गिळलेलें माणिक परत देण्यास इंग्रज-नक्र तयार नव्हता. म्हणून राष्ट्रसभेनें अखेरच्या स्वातंत्र्य लढ्याची घोषणा केली. कोट्यवधी कंठांनी भारतीयांनीं ब्रिटिश सत्तेला 'छोडो भारत' चा आदेश दिला.

८ ऑगस्टला राष्ट्रसभेनें तो ऐतिहासिक ठराव मुंबईंत मंजूर केला आणि नऊ ऑगस्ट रोजीं राष्ट्रनेत्यांवर झडप घालून ब्रिटिशांनीं त्यांना जनतेच्या दृष्टिआड केलें. या नेत्यांना भारतांतून हद्दपार करून आफ्रिकेंत नेऊन ठेवण्याचा ब्रिटिशांचा विचार होता. पण पुढें त्यांनी तो बदलला आणि माझ्या भाग्यानें त्या नेत्यांची पदधूली माझ्या शिरावर पडली.

पं. जवाहरलाल नेहरू, सरदार पटेल, मौलाना आझाद, आचार्य कृपलानी; पं. गोविंदवल्लभ पंत, डॉ. पट्टाभी सीतारामय्या, असफअली, डॉ. सय्यद महमूद, शंकरराव देव, डॉ. प्रफुल्लचंद्र घोष हे राष्ट्रसभेच्या कार्यकारिणीचे सभासद जागतिक महायुद्धाच्या आणि भारतीय स्वातंत्र्य युद्धाच्या अत्यंत आणिबाणीच्या काळांत माझ्या संन्निध होते. राष्ट्रसभेची कार्यकारिणी म्हणजे एकप्रकारें स्वतंत्र भारताचें मंत्रिमंडळच होतें. त्या थोर पुरुषांच्या आशाआकांक्षा, सुखदुःखें, तळमळ आणि वेदना, शौर्य आणि अगतिकता यांचा क्षणोक्षणीं मला अनुभव येत होता.

या पुरुषाचें व्यक्तिगत जीवन तर तेथें घडतच होतें, पण त्यांचें जीवन राष्ट्राच्या इतिहासाशीं गुंफलेलें होतें, म्हणून त्याला ऐतिहासिक महत्व आलें होतें राष्ट्राचें भवितव्य घडवूं पहाणारे हे पुरुष पिंजऱ्यांत कोंडलेल्या सिंहाप्रमाणें अगतिक झाले होतें आणि म्हणून मग ते राष्ट्राच्या भूतकाळाचा शोध घेऊं लागले. राष्ट्राचा वर्तमानकाळ घडविणाऱ्या भूतकाळाचा प्रवाह कसकसा वहात आला हें ते हेरूं लागले. राष्ट्राच्या भविष्यकाळाचें चित्र रेखाटण्याची त्यांची ती एक शैली होती. आणि अनेकांनीं अशीं अनेक चित्रें रेखाटलीं.

पं. नेहरूंनीं येथें 'भारताचा शोध' घेतला. त्यांची काव्यमय वृत्ती, भूतकाळाकडे पाहाण्याची शास्त्रीय दृष्टि, भविष्याला आव्हान देणारी आत्मविश्वासाची स्फूर्ति त्या ग्रंथराजांत ओतप्रोत भरून राहिली आहे. कोणी कांहीं, कोणी कांहीं लिहिलें. सरदार पटेलांसारख्यांनीं कांहींच लिहिलें नाहीं. देशांत मोठें उत्पात होत होतें आणि नेत्यांचीं मनें या ठिकाणीं तडफडत होतीं. हळूहळू देशांतील परिस्थिती शांत झाली आणि जागतिक महायुद्धहि आटोक्यांत आलें. बाहेरच्या या बदललेल्या परिस्थितीची जाणीव माझ्या सान्निध्यांत असलेल्या नेत्यांना होऊं लागली. त्यांच्या माझ्या वियोगाचा दिवस जवळ येऊं लागला.

बाहेर गेल्यानंतर काय करावें लागेल याचे तर्कवितर्क हे नेते करीत होते. स्वातंत्र्य लढ्यासाठीं पुन्हा संघटनेला हात घालावा लागणार असें त्यांना वाटत होतें. नेत्यांना या दीर्घ एकांतवासानंतर विश्रांति हवी होती. पण जें घडलें तें त्यांच्या अपेक्षेबाहेरचें होतें. ते बाहेर आले त्यावेळीं स्वातंत्र्यच त्यांच्या स्वागतासाठीं सज्ज होत होतें. कारण जगांत दुसऱ्या महायुद्धानें क्रांति झाली होती.

स्वातंत्र्याच्या या सेनापतींना मी निरोप दिला. ते बाहेर गेले आणि थोड्याच काळांत पंधरा आगस्ट उजाडलें. भारतीय स्वातंत्र्याचा अशोक चक्रांकित ध्वज फडकला. त्या पंधरा आगस्टबरोबर माझ्या अंगावर रोमांच उभे रहातात. माझ्या जीवनांतील तो ऐतिहासिक कालखंड आठवतो आणि अंगावर रोमांच उभे रहातात.

• • •

अनुक्रमणिका






# फार्गो

## डीझेल्स

## राष्ट्राच्या सेवेसाठीं

फार्गो डिझेल ट्रक निरनिराळ्या विकास योजनांच्या ठिकाणीं त्यांना नेमून दिलेल्या कामापेक्षां कितीतरी अधिक कामगिरी बजावीत आहेत, याचें कारण त्यांची मजबूत रचना आणि बनावट तसेंच दर फेरीमागें अधिक वजन वाहून नेण्याच्या शक्तीमुळें येणारा कमी खर्च हें होय. कितीही वजनी माल असो किंवा रस्ता खूप अवघड असल्यामुळें तो माल वाहून नेण्याचें काम कितीही कठिण असो, हे ट्रक सेवा, कामगिरी आणि काटकसर या बाबतींत पहिल्या दर्जाचे सिद्ध झाले आहेत



**'फार्गो'** डीझल ट्रक

आतां नवीन, अधिक शक्तिशाली आणि खर्च कमी येणाऱ्या एंजिनासह मिळतात

प्रगतिशील कारखानदार

### दी प्रीमीअर ऑटोमोबाइल्स लिमिटेड

मुंबई



S.STA'S PAL 206-MAR.

आपल्या नजीकच्या डिलर्सना भेटा अगर लिहा









*आगाखान पॅलेसनें म्हणजे दरबारीं सुखासीन जीवनाचा परमोत्कर्ष पाहिला. पण भवितव्य केव्हां केव्हां राजराजेश्वराला विरागी बनवितें. त्याप्रमाणें एक दिवस याचाहि कायापालट झाला. आणि त्याग व शुचिता यांचं मूर्तिमंत प्रतीक असलेल्या महात्माजींच्या स्थानबद्ध सहवासाचा लाभ पू. कस्तुरबा आणि महादेवभाई यांच्या अखेरींची शोकांतिका इथेंच घडली. अशा या हतभागी सौधाची कहाणी* **गोविंद तळवलकर** *यांनी त्याच्याच भाषेंत लिहिली आहे.*

# आगाखान प्रासादाचें आत्मचिंतन

दैवाचा योग कांहीं विलक्षणच असतो. पुणें नगरीपासून कांहीं अंतरावर आगाखान प्रासाद म्हणून माझी उभारणी झाली. तेव्हां आगाखानसाहेबांच्या विलासी प्रासादांपैकीं एवढीच माझी गणना होत होती. मालकसाहेबांचा पदस्पर्श मला कधीं झाला कीं नाहीं हेंहि मला आठवत नाहीं. पण त्याच माझ्या आयुष्यांत १९४२ च्या ऑगस्टपासून नंतर जे एकवीस महिने गेले त्याचे विस्मरण कधींच होणार नाहीं. सुखविलासासाठीं म्हणून माझा जन्म झाला पण स्वातंत्र्याच्या रणभेरी फुंकल्यानंतर स्वातंत्र्य चळवळीचा नेता माझ्या येथें वास्तव्याला आल्यानें जगाच्या इतिहासांत माझें नांव अजरामर झालें. 'पुष्पसंगे मातीस वास लागे' अशी स्थिती झाली.

नगरापासून दूर असल्यानें जनसंपर्क मला फारसा घडत नसे. तेव्हां १९४२ च्या जुलैंत स्वातंत्र्य चळवळीचे वारे सुरू झाले त्याच्या केवळ झुळका माझ्या अंगावरून गेल्या न गेल्या. पण ऑगस्टचा पहिला आठवडा उलटतांच माझ्याभोंवतीं पहारा बसला आणि ९ तारखेला सकाळीं दोन मोटरी व लॉऱ्या फाटकांतून आंत आल्या. मोटरी दारापाशीं थांबल्या तेव्हां मी आश्चर्यचकित झालों. भारताला 'करेंगे या मरेंगे' हा मंत्र देऊन ब्रिटिश सत्तेला चालते व्हा असा इशारा देणारा महात्मा माझ्या येथें वास्तव्याला आला होता. गांधीजींची कृशमूर्ति मोटरींतून उतरली व त्यांना बरोबर घेऊन मीराबेन, महादेवभाई देसाई हेहि उतरले. ज्या ब्रिटिशांनीं आगाखानसाहेबांना 'विश्वासू मित्र' म्हणून गौरविलें होतें त्याच आगाखानांच्या मिळकतींत भर म्हणून पडलेल्या माझ्या वास्तूंत ब्रिटिशांना चालते होण्यास सांगणारा व देशभर आगडोंब उठविणारा स्वातंत्र्ययुद्धाचा सेनापति स्थानबद्ध झाला होता.

महात्माजी आल्यानंतर त्यांनीं अंग मर्दन करून घेतलें. दीड तास चाललेल्या मर्दनाचें वेळीं त्यांनी झोप काढून घेतली आणि नंतर लगेच लिखाणाला सुरवात केली. आदल्या दिवशींचें एक इंग्रजी सायंदैनिक त्यांच्या जवळ होतें. त्यांत भारत सरकारचा प्रदीर्घ फतवा प्रसिद्ध झाला होता. त्यांतील प्रत्येक मुद्याला उत्तर देण्याचें गांधीजींनीं ठरविलें होतें. दुपारीं त्यांचें लेखनच चालू होतें. महादेवभाईंना अतिशय झोप लोटली होती. दहा तारखेला मुंबईचे गव्हर्नर सर रोसर लम्ले यांना महात्माजींनी एक पत्र लिहिलें आणि आपल्याबरोबर इतर कॉंग्रेस नेत्यांना कां ठेवले नाहीं याची त्यांनीं पृच्छा केली. सरदार पटेल यांना पोटदुखीचा त्रास होता व आपण त्यावर उपाययोजना करीत असल्यानें सरदारांनी आपल्या जवळ राहणें आवश्यक आहे असें त्यांनीं लिहिलें होतें. 'रामदासा दासां सांभाळीतो कैसा ? जीवप्राण जैसा तैसा पाहे' याचाच प्रत्यय त्यांच्या या पत्रांत येत होता.

गांधीजी येथें आले तेव्हां कस्तुरबा मुंबईंत राहिल्या होत्या पण त्याहि सभाबंदीचा हुकूम मोडून आल्या. त्यांनीं बापूजींना बाहेरील हकिगत सांगितली. कॉंग्रेसच्या लोकांना अटक झाल्यामुळें देशभर चळवळीचा डोंब उठला होता. लोकांना नेतृत्व देण्यास कोणी उरले नव्हते व प्रत्येकानें नेता बनावे व स्वातंत्र्याची चळवळ पुढें न्यावी हा गांधींनीच दिलेला संदेश लोक कसा आचरणांत आणीत आहेत याची माहिती बांनीं बापूंना दिली. गांधीजींना वृत्तपत्रें वाचावयास मिळत नव्हती. त्यामुळे त्यांना या माहितीचें महत्व फार वाटलें. ते फार गंभीर झाले आणि भारत सरकारच्या फतव्याला तें अधिकच उत्साहानें उत्तर देण्यास बसले. १४ तारखेला त्यांचें हें प्रदीर्घ पत्र महादेवभाईंनी बडया लाटांना धाडलें. तेव्हां दुसऱ्याच दिवशीं काय आपत्ति कोसळणार आहे याची कोणाला कल्पना नव्हती. आपल्याला सहावर्षें येथें बंदिवासांत रहावें लागेल अशी महात्माजींची कल्पना होती व त्याप्रमाणें त्यांनी तयारी केली होती व त्यांनी तयारी केली म्हणून इतरांनीहि केली. पण काळानें वेगळीच तयारी केली होती. कारण १५ तारीख उजाडली. आणि गांधीजींचे चिटणीस म्हणून ३५ वर्षे अविरत काम कारणारे महादेवभाईंना हृदयविकाराचा झटका आला व लगेचच त्यांचें प्राणोत्क्रमण झालें. गांधीजींना हें कळतांच ते अगदी हतबुद्ध झाले. अनेक







संकटांना धैर्यानें तोंड देणारे बापूजी आपल्या या ब्रह्मिश्वर प्राणाच्या निधनानें शोकाकुल झाले. महादेवभाईंच्या शय्येपाशीं उभे राहून ते ' महादेव महादेव ' म्हणून हांका मारूं लागले. महादेव म्हणून हांक मारताच महादेवभाई गेल्या पस्तीस वर्षांत कधीं आले नाहींत असें झालें नाहीं. पण आतां गांधीजींच्या हांकेपलीकडे त्यांचा हा ब्रह्मिश्वर प्राण निघून गेला होता. पण आशा वेडी असते आणि महात्मा झाला तरी त्यालाहि आशा होतीच म्हणून गांधीजी अतिशय दुःखभरल्या आवाजांत म्हणाले, " महादेव जर एकदांच माझ्याकडे डोळे उघडून पाहील तर तो असा मला सोडून जाणार नाहीं. " मग थरथरत्या हातांनीं त्यांनी महादेवभाईंच्या मृत शरीराला स्नान घातलें; व चंदन लावलें. फुलांनीं सर्व शरीर शृंगारण्यांत आलें. हें सर्व करीत असतां गांधीजी म्हणाले, " महादेव हें तूं माझ्यासाठीं करशील असं मला वाटत होतं पण मलाच हें करण्याची पाळी आली. "

महादेवभाईंना अग्निसंस्कार माझ्याच आवारांत करण्यांत आला. आपल्या ' मुला ' चें शरीर सरकारच्या वा इतर कोणाच्याहि हातीं देण्यास आपण तयार नाहीं असें त्यांनीं सरकारला कळविलें होतें. अग्निसंस्कार गांधीजींनींच केला व ते म्हणाले, " करेंगे या मरेंगे या मंत्रानुसार महादेव खरोखरच वागला. त्याच्या या आत्मयज्ञानें भारताचा मुक्तिदिन जवळ येणार आहे. " गांधीजींनीं नंतर महादेव भाईंच्या पत्नीला तार करून सारी हकिगत कळविली पण ती तार तीन आठवड्यांनें पत्नीच्या हातीं पडली असें मला नंतर कळलें. तिसऱ्या दिवशीं महादेवभाईंच्या शरीराची रक्षा व अस्थि गोळा करण्यांत आली. व तेथें समाधि बांधण्यांत आली. रोज सकाळीं त्या समाधिपाशीं जाऊन तिला फुलें वाहणें, तिच्यापाशीं थोडावेळ बसणें हा गांधीजींचा नंतर परिपाठ झाला. महादेवभाईंच्या मृत्युनंतर स्वातंत्र्याच्या चळवळीचा जोर अधिकच वाढला व त्या वार्ता माझ्या कानावर येऊन आदळत होत्या.

ऑगस्ट महिना गेला व स्थानबद्धांवरील कडक निर्बंध थोडे सैल झाले. नोव्हेंबर महिना उजाडला आणि अष्टि चिमूरच्या अत्याचारांच्या निषेधार्थ प्रो. भन्साळींनीं उपोषण करण्याचा निर्णय जाहीर करण्याची परवानगी मागितली. पण ती नाकारण्यांत आली. प्रो. भन्साळींनीं उपोषण करूं नये एवढें कळवावयाचें असल्यास कळवा म्हणून सरकारतर्फे सांगण्यांत आलें. तेव्हां गांधी त्यास तयार झाले नाहींत.

३१ डिसेंबरला ४२ साल संपत होतें. गांधीजींनीं व्हॉइसरॉय लॉर्ड लिनलिथगो यांना पत्र लिहिलें आणि आपल्याला व इतर असंख्य लोकांना विनाकारण तुरुंगांत डांबण्यांत आल्याचा त्यांनीं निषेध केला. तुरुंगवास हा सत्याचा व स्वातंत्र्याचा संदेश देण्याचा एक मार्ग आहे पण तो मर्यादित आहे म्हणून अन्नत्याग करून हा संदेश अधिक परिणामकारकरित्या प्रसारित व्हावा अशी आपली इच्छा महात्माजींनीं स्पष्ट केली व आपलें काय चुकलें तें स्पष्ट करण्याची लॉर्ड लिनलिथगो यांच्यापाशीं मागणी केली. लॉर्ड साहेबांचें उत्तर ठराविक ठशाचें होतें. त्यावर पत्रापत्रीं झाली व मग जानेवारीच्या अखेरीला एक पत्र लिहून महात्माजींनीं आपण ९ फेब्रुवारीपासून २१ दिवसांचा उपवास करण्याचा मनोदय जाहीर केला. तेव्हां व्हॉइसरॉय व गांधीजी यांच्यांत प्रदीर्घ पत्रव्यवहार झाला. पण ९ फेब्रुवारीपासून बापूजींचा उपवास सुरू झाला. ब्रिटिश सरकारनें ही बातमी जगभर प्रसिद्ध केली आणि गांधी व व्हॉइसरॉय यांच्यांतील पत्रव्यवहारहि त्याच वेळेला प्रसिद्ध केला.

महात्माजींच्या उपवासाची वार्ता प्रसिद्ध होतांच सान्या जगाला धक्का बसला. डॉ. गिल्डर, डॉ. रॉय यांसारखे डॉक्टर महात्माजींपाशीं आले. माझे दरवाजे उघडले गेले व अनेक मंडळी भेटावयास येऊं लागली. गांधीजी यावेळीं उपवासांत पाण्याबरोबर लिंबू पिळून घेत पण दुसऱ्या आठवड्यांत त्यांची प्रकृति भलतीच क्षीण झाली. सर्वत्र चिंता व्यक्त होऊं लागली. महात्माजींच्या परिवारांतील मंडळी दुःखीकष्टी चेहऱ्यानें वावरत व त्यांच्या चेहऱ्याकडे पाहिल्यावर माझ्या पोटांत कालवाकालव होत असे. सरकारनें गांधीजी मरण पावल्यावर त्यांच्या प्रेतदहनाची तयारीहि गुप्तपणें केली होती. तथापि सुदैवानें महात्म्याचा प्राण माझ्या येथील वास्तव्यांत गेला नाहीं.

गांधीजींचें उपोषण समाप्त झाल्यावर परदेशी पत्रांनीहि ब्रिटिश सरकारनें आपलें धोरण बदलावें म्हणून सूचना केल्या. स्थानबद्ध गांधीजींना ही मतें कळलीं. प्रसिद्ध नाटककार बर्नार्ड शॉ यांनीं लिहिले होतें,—" दुराराध्य तुरुंगवास दाखवावयास लावून चोडचूक करावयास लावली आहे. राजानी म्हणूनच गांधींना सोडून द्यावें. राजकीय धोरणाचा विचार न करतां त्यांची बिनशर्त सुटका करावी आणि आपल्या मंत्रिमंडळाच्या बौद्धिक विकृतिबद्दल गांधींची माफी मागावी ! "

गांधींना सोडून देण्याची मागणी भारतांत सर्वत्र होऊं लागली. पण सरकार कांहीं ऐकावयास तयार नव्हतें. अमेरी, लॉर्ड सॅम्युअल इत्यादी ब्रिटिश अधिकारी लोकसभेंत विकृत मतप्रदर्शन करीत होते म्हणून गांधीजी त्यांना खलिते पाठवून उत्तरें देत होते आणि काँग्रेसच्या धोरणाचा खुलासा करीत होते. मॅक्सवेलनें असेच अनेक दोषारोप केले होते त्यालाहि बापूजींनीं मुद्देवार उत्तर पाठविलें. गांधीजी येथें येऊन आतां एक वर्ष पूर्ण झालें होतें. तत्पूर्वी सरकारनें ४२ च्या दंगली बाबतची काँग्रेसची जबाबदारी या नांवाचें एक ८६ पानांचे चोपडें प्रसिद्ध केलें. गांधीजींनी त्या चोपड्याला उत्तर देणारा प्रदीर्घ खलिता सरकारकडे धाडून दिला.

४३ चा डिसेंबर महिना उजाडला आणि कस्तुरबांची प्रकृति बिघडूं लागली. तुरुंगवास त्यांना सहन होत नव्हता. महादेवभाईंच्या मृत्युनें त्या खचल्या होत्या व बापूजींच्या उपवासांत त्यांच्या मनावर विलक्षण ताण पडला होता. आजारांत त्यांचे दोन अडीच महिने गेले आणि २२ फेब्रुवारी १९४४ ला गांधीजींच्या मांडीवर डोकें ठेवून बांचे प्राण गेले. दुसऱ्या दिवशीं अग्निसंकार करण्याचें ठरलें. पण गांधीजी सारखे त्या शवापाशीं बसून होते. आणि प्रेताला अग्नि दिल्यावर चितेपाशीं तें सहा तास बसले होते. उन्ह तापलें होतें पण गांधीजी तसेच बसले होते. हलुहलू यांच्या शरीराची रक्षा होत होती. " या अशावेळीं माझ्या विश्वासू जीवन सहचरी पासून मी दूर कसा राहूं शकणार ? " असे ते विचारीत होते. त्यांच्यापाशीं बस-

( पान ६५ वर चालू )










सेवाग्राम म्हणजे महात्माजींच्या अहिंसात्मक राष्ट्व्यापी लढ्याची गंगोत्री महात्माजींच्या सततच्या वास्तव्यानें कैलास मानसरोवरापेक्षांहि या स्थळांचें पावित्र्य वाढलें आहे—पण आज तिथं महात्माजींच्या कार्याची नांवनिशाणीहि उरलेली नाहीं. सेवाग्रामचं हें दुःख **काशिनाथ पोतदार** यांनीं बोलकं केलं आहे.

# से वा ग्रा म - सं हि ता

युगपुरुषाचें जेथें वास्तव्य होतें, भारतीय स्वातंत्र्य लढ्याचीं सूत्रें जेथून हलविलीं जात होतीं, त्या सेवाग्रामचें मी जीवनांत दोनदां दर्शन घेतलें. पहिल्यांदा गेलों तेव्हां महात्माजी हयात होते. परंतु सेवाग्रामांत नव्हते. त्यांना अगदीं जवळून पाहण्याची, शक्य तर त्यांच्याशीं दोन शब्द बोलण्याची माझी मनीषा अपुरीच राहिली. पण सेवाग्रामांतील सर्व चराचर सृष्टि माझ्याशीं बोलली. तेथील प्रत्येक हालचालीं-तून बापूंच्या पुनीत अस्तित्वाची मला जाणीव झाली. लुई फिशर यांच्या "ए वीक् वीथ् गांधीजी" पुस्तकांतील तीं मार्मिक प्रश्नोत्तरें, तो दांडगा आत्मविश्वास, जबडा उघडतांच यशोदेला तेहतीस कोटी देवांचें दर्शन घडविणाऱ्या श्रीकृष्णाप्रमाणें तें साक्षात्कारी मोकळें हास्य या सर्व गोष्टी माझ्या भावचक्षुंसमोर तरळून गेल्या. महात्माजींचीं स्मृतिचिन्हें म्हणून ज्या वस्तू आतां सेवाग्रामांत आढळ-तात त्यापैकीं बहुतेक वस्तु तेव्हां महात्माजीं-बरोबर होत्या. खरें म्हणजे त्यावेळीं त्यांची गरजच नव्हती. साऱ्या सेवाग्रामवर त्या पुण्यात्म्याच्या तेजाची झळाळी पसरली होती. आपल्या कुटीसमोर महात्माजींनी स्वहस्तें एक पिंपळाचें झाड लावलें आहे. तो अश्वत्थ सळसळला तरी महात्म्याची चाहूल लागे. वाटे पंचवीसशें वर्षांपूर्वीं सारनाथच्या परिसरांत उगवलेला हा बोधिवृक्ष आतां या ठिकाणीं अवतरला आहे. त्याच्या छायेंत तपोवलय दिसत होतें, शेजारींच कस्तुरबांनीं लावलेला बकुळ त्या पुण्यपुरुषाचा सुगंध दशदिशांत पसरवित होता. सेवाग्राम ही त्याकाळीं तपोभूमि बनली होती.

अलिकडेच मी दुसऱ्यांदा सेवाग्रामला जाऊन आलों. आतां त्या आश्रमात राम राहिलेला नाहीं आणि कांहीं रयाहि दिसली दिसली नाहीं. अग्नि विझला, फक्त रक्षा उरली आहे. ज्योत केव्हांच मालवली. केवळ काजळी राहिली आहे. चरखा चालू आहे पण त्यांत ते क्रांति—संगीत नाहीं. पिंपळ सळसळतो आहे पण त्यांत तें चैतन्य नाहीं. बकुळाखालीं निर्माल्य सांडलें आहे. सेवाग्राम एखाद्या कलेवरासारखें भासलें. लेनीनच्या अनुयायांनीं त्याचा मृत देह रसायनांच्या सहाय्यानें असा जपून ठेवला आहे तसेंच सरकारी रसदीच्या जोरावर सेवाग्राम उभे आहे. कोठें तो पूर्वाश्रमींचा क्रांतिकारी आश्रम आणि कोठें हें त्याचें आजचें भकास विडंबन ! भारत सरकारच्या पुराणवास्तु खात्याच्या पाट्या येथें जागोजाग लावल्या कीं हें विडंबन पूर्ण होईल !

मी गेलों तेव्हां सूर्योदय झालेला होता. परंतु सेवाग्रामच्या परिसरांत सर्वत्र सन्नाटा पसरला होता. काय करावें, काय न करावेंच्या भकास पोकळीनें क्रांतीचें तें अर्भक गिळलें होतें. महात्माजींच्या झोंपडींत पाऊल टाकलें तेव्हां त्यांच्या जीवन-साथी काठीचें प्रथम दर्शन झालें. तिला चालविणारा हात निघून गेल्यानें ती आतां कोपऱ्यांत बंद कांचेच्या कपाटांत पडली होती. बापूंची माळ, चष्मा, लेखन साहित्य, तीन माकडांची ती प्रतीकात्मक मूर्ति इ. सर्व साहित्य व्यवस्थित मांडून ठेवण्यांत आलेलें दिसलें खोली झाडून अगदीं स्वच्छ ठेवलेली होती. बापूंचें स्नानगृह, त्यांचें मालिशाचें साधें लांकडी मेज वगैरे वस्तुसुद्धां जपून ठेवलेल्या होत्या. सर्वत्र अशी निर्जीव जपणूक दिसली. महात्माजींच्या शिकवणुकीची कुठें जाण दिसते कां, हें मी पाहात होतों.

बापूंच्या कुटीशेजारीच महादेवभाईंची झोंपडी आहे. हनुमंतानें रामराथाची ज्या निष्ठेनें सेवा केली त्या निष्ठेनें महादेवभाई महात्माजींजवळ राहिले. आज त्यांच्या कुटींतूनहि ओंकारध्वनि घुमत नाहीं. महादेवभाईंच्या मृत्यूनंतर ज्या भूमीवर महात्माजींचे अश्रु ओघळले त्या भूमीवर आतां मातीच्या पापुद्र्याखेरीज कांहींहि खुणा राहिलेल्या नाहींस.

बुद्धासारख्या थोर महात्म्याचा आपल्या शिष्यांविषयीं जिवंतपणींच भ्रमनिरास झाला होता म्हणे ! महात्माजींच्या जीवनांतहि अखेर अखेर अशीच भग्नाशा दिसत होती. नथूराम गोडसेसारख्या माथेफिरूनें त्यांच्या पार्थिव शरिराला गोळ्या घातल्या 'त्या आधींच त्यांच्या तत्त्वज्ञानाची चिता पेटली होती. नोखालींत किंवा बिहारमध्यें प्राण पणास लावून गांधीजींनीं गांधीवाद वाचविण्याचा प्रयत्न केला. त्यावेळीं त्या महापुरुषाला कशा यातना झाल्या असतील, आपल्या एकेक शिष्यवराच्या 'हृदय परिवर्तना' नें त्या पुण्यात्म्याचें कसें आंतडे तुटलें असेल त्याची सेवाग्राम आश्रमाच्या या भिंतींना कांहीं जाणीव असेल कां ? त्या चंद्राकार बोलक्या चेहेऱ्यावरील काळवंडी कोणी टिपली असेल काय ?

महात्माजींच्या त्या पिंपळाखालीं मी क्षण-भर जाऊन बसलों. येथेंच त्यांच्या प्रार्थना होत. आतां सर्वत्र सामसूम होती. प्रार्थनेचे सूर विरून गेले होते. अन्नासाठीं बाहेर पडलेल्या पक्ष्यांचा किलबिलाट फक्त सुरूं होता,

" सध्यां आश्रमांत कोण कोण सेवक आहेत?" एका आश्रमवासीयाला मी विचारलें. आशादेवी आर्यनायकम्, 'दादुजी' या नांवानें ओळखले जाणारे नॉर्मन कार्डिस् हे एक वृद्ध जर्मन गृहस्थ आणि आणखी कांहीं मंडळी असल्याचें कळलें. थोर पुरुषाच्या शिकवणीचे सर्वच बी खडकावर पडत नाहीं. महात्माजींच्या हयातींत जगाकडे पाठ फिरवून असलेला पवनारचा पावन पुरुष त्यांच्या देहावसानानंतर भारत-भ्रमणास निघाला. भूदानाच्या रूपानें गांधीवादाचें नवें चित्र लोकांसमोर आलें. किंकर्तव्यमूढ झालेले कित्येक सेवक त्या मोहिमेंत सामील झाले. सेवाग्राम आश्रम मात्र कांहींसें एकाकी जीवन कंठीत आहे.

" महात्माजी येथून नक्की केव्हां गेले?" दुसऱ्या एकास मी प्रश्न विचारला. " मला कांहीं माहित नाहीं साहेब. मी त्या समोरच्या विहिरीवरचें यंत्र चालवितों." त्यानें प्रांजलपणें सांगितलें.

" सेवाग्रामांत विहिरीवर यंत्र आहे?" मी सहज विचारून गेलों.

" होय साहेब, आम्हीं येथें भाजीपाला, धान्य वगैरे पिकवितों. आश्रमाला लागणारें सर्व कांहीं येथेंच होतें." त्या गृहस्थानें अधिक माहिती दिली.

" आश्रम सर्व बाबतींत स्वयंपूर्ण आहे काय? बाहेरून तुम्हीं कांहींहि मदत घेत नाहीं?" मी पुन्हां विचारलें. यावर त्यानें उत्तर दिलें नाहीं.

सेवाग्रामच्या परिसरांत हिंदुस्तानी तालिमी संघ अजूनहि चालला आहे. कुष्ठरोग सेवा केन्द्र सुरू आहे. कस्तुरबा हॉस्पिटल चांगलें कार्य करीत आहे. सर्वोदय सेवा संघाची मुख्य कचेरी येथें आहे. पण हें यंत्रवत् चाललें आहे. ता. २५ ऑगस्ट १९४६ रोजीं बापू येथून गेले ते कधींच परतले नाहींत. तेव्हांपासून सेवाग्राम त्यांची व्याकुळतेनें प्रतीक्षा करीत आहे. पुन्हां केव्हां धर्मचक्र प्रवर्तन होतें त्याची ही सृष्टि वाट पाहात आहे.

मधून मधून हे नाहींतर ते मंत्री सेवाग्रामांत मोटार–धूळ झाडून जातात. राष्ट्रपति व पंतप्रधानसुद्धां एकेकदां येऊन गेले. तसे आपले राष्ट्रनेते अतिशय भावनाप्रधान आहेत. सेवाग्रामच्या परिसरांत त्यांना भडभडून येते. उपरति होते. सत्ता सोडून केवळ जनसेवा करीत राहण्याचे विचार येतात आणि तसे ते बोलूनहि दाखवितात. पण येथून बाहेर पडतांच कार्यबाहुल्यामुळें त्यांना सर्व गोष्टींचा विसर पडतो. आपण सत्ता सोडली तर या देशाचें काय होणार; हा भीषण प्रश्न. त्यांना काय राज्य चालवावयाचें होते? यामुळें गांधीजीचे शिष्यवर कात टाकावी इतक्या जलदतेनें मूलमंत्र विसरूं शकतात. एकटा सेवग्राम आश्रमच मूक आक्रंदन करीत मागे राहतो.

महात्माजींची ही पर्णकुटी कधींतरी आपल्या मनींचें दुःख बोलून दाखविल काय? तिला वाचा फुटल्यास ती काय सांगेल? पूर्वीं येथें राजहंस जमत असत आतां कावळ्यांचा कलकलाट चाललेला असतो असे उद्वेगजनक उद्गार तर तिच्या तोंडून निघणार नाहींत? तूर्त तरी आश्रमानें मौन व्रत धारण केलें आहे. शिळा होऊन पडलेल्या अहिल्येसमान सेवाग्राम निश्चेष्ट पडलें आहे. महापुरुषांचीं पावलेंसुद्धां सहज लिलया पुसून टाकणारा काळ वर्धेच्या किनारीं विकट हास्य करीत आहे.

माझें मन असें विषण्ण बनलें असतांनाच आश्रम दाखविणारा एक इसम सूचक लाचारीनें बक्षीस मागत होता, " आठ मुलें आहेत साहेब मला. काय करूं? पत्नी पुन्हां गरोदर आहे." आधींच हळव्या बनलेल्या मनाला जबरदस्त तडाखा बसला. आपल्या आश्रमांतील एकाच्या या संयमनाची वार्ता ऐकून स्वर्गांत गांधीजींनीहि कपाळाला हात लावला असेल! सदेह स्वर्गाला जाऊन आपले पीठ, शिष्य इ. कांहींहि मागें न ठेवणारा तुकाराम किती दूरदर्शी होता हें आजचा सेवाग्राम आश्रम, शांति निकेतन इ. स्थळें पाहून कोणातहि पटेल. बिचारे सेवाग्राम! खिन्न, अधोमुख सेवाग्राम!!

• • ●

( पान ६३ वरून चालू )

लेल्यांना ते बांच्या अनेक आठवणी दुःखी अंतःकरणानें सांगत होते. मग ते जणूं आपल्याशीच म्हणाले, " बाशिवाय जीवन जगण्याची कल्पनाच मी करूं शकत नाहीं. इतकी ती माझ्याशीं एकरूप झाली होती. तिच्या मृत्युनें माझ्या जीवनांत कायमची पोकळी निर्माण झाली आहे" एवढें बोलून त्या महात्म्याच्या डोळ्यांतून अश्रू वाहूं लागले.

नंतर गांधीजींचा नव्यानें बदलून आलेले व्हॉइसरॉय लॉर्ड व्हेव्हेल यांच्याबरोबर पत्रव्यवहार चालूच होता. ४४ साल उजाडले व गांधीजींची प्रकृति क्षीण होऊं लागली व मग ५ मेला कर्नल भंडारी संध्याकाळी गांधीजींना भेटावयास आले व दुसऱ्या दिवशीं सकाळीं आठला तुम्हांला मुक्त केलें जाईल असें त्यांनीं सांगितले. तेव्हां गांधीजींना तें खरेंच वाटलं नाहीं. त्यांनीं विचारले, " तुम्ही थट्टा तर करीत नाहीं?" कर्नल भंडारींनीं त्यांची खात्री पटविली; व ते म्हणाले, " मी काळजींतून सुटलों. काळजीत माझे केंस किती पांढरे झाले आहेत ते पाहिलेत? आतां कृपा करा आणि पुन्हां तुरुंगांत येऊं नका." गांधीनीं मग त्यांना थट्टेनें विचारले, " मी पुण्यांत कांहीं दिवस राहिलों तर माझ्या गाडीभाड्याचं काय?" " तें मिळेल काळजी नको?" भंडारींनीं आश्वासन दिले.

आणि मग सहा तारीख उजाडली. २१ महिने निघून गेले. दोन जीव बळी पडले आणि गांधीजींच्या जीवनांत पोकळी निर्माण झाली. सकाळीं आठ वाजतां गांधीजी मोटारींतून निघाले. मी त्या स्वातंत्र्य लढ्याच्या सेनापतीला प्रणाम केला. फाटकांत त्यांची गाडी आलीं तेव्हां महादेवभाई व कस्तुरबा यांच्या स्मरणानें त्यांचे डोळे पाणावले होते. बाला तुरुंगांतून बाहेर जावयाचें होतें असे ते म्हणत होते. गांधीजींची गाडी निघून गेली. पुन्हां पुण्याचा मुक्काम हलवितांना गांधीजी एकदां येथें आले व त्यांनी—महादेवभाई व कस्तुरबा यांच्या समाधींचे दर्शन घेतले. माझें आयुष्य आतां किती आहे तें कुणास ठाऊक पण गांधीजींच्या वास्तव्यांतील माझे २१ महिने माझ्याच नव्हे तर राष्ट्राच्याहि जीवनाला वेगळे वळण देणारे होते.









## ऑगस्ट क्रांतिचें पुण्यस्मरण

भारतीय जीवनांत ऑगस्ट महिन्याचा महिमा अनन्यसाधारण ! भारताच्या इतिहासांतील महत्त्वपूर्ण उलाढाली याच महिन्यांत प्रामुख्यानें घडल्या. १ ऑगस्टला लोकमान्यांचें झालेलें शोचनीय निधन म्हणजे भारताच्या राजकीय इतिहासांतील एक क्रांतिकारक क्षण. भारताचे अनभिषिक्त सम्राट अशी सार्थ पदवी त्यांनीं स्वजनोंकडून मिळविली आणि हिंदी राजकीय असंतोषाचे जनक असें भूषणास्पद दूषण त्यांनीं परकीयांकडून मिळविलें. परकी राजसत्तेविरुद्ध लढ्याचें पहिलें रणशिंग लोकमान्यांनींच फुंकलें आणि त्यांच्याच मागोमाग महात्माजींनीं देशाचें नेतृत्व स्वीकारून भारतीयांना सत्याग्रहाची दीक्षा दिली.

ऑगस्टच्या सात तारखेस महर्षि रविंद्रनाथ ठाकूर यांचें निधन झालें. भारताची कीर्ति सातांसमुद्रापलीकडे नेणारे गुरुदेव म्हणजे भारतीय संस्कृतीचें आदर्श असें आधुनिक प्रतीक. गीतांजलीनें आंग्ल कवींनाहि मंत्रमुग्ध केलें. रविंद्रनाथांची ही पुण्यतिथी भारतभर मोठ्या भक्तिभावानें साजरी होते ती ऑगस्ट महिन्यांत.

पण ऑगस्ट महिन्याचें नांव चिरस्मरणीय केलें ८ ऑगस्टच्या चले जाव ठरावानें. आणि त्यानंतर पुढाऱ्यांच्या अटकेमुळें देशभर उसळलेला तो अभूतपूर्व प्रक्षोभ. सारा देश त्यानें ढवळून निघाला, आणि आंग्ल राजवटीला त्यानें फार मोठा हादरा दिला. ऑगस्ट क्रांतीची फलश्रुति हीच कीं तिनें स्वातंत्र्य समीप आणलें.

आणि सात वर्षांनीं १५ ऑगस्ट रोजीं ब्रिटिशांनीं अखेर सत्तांतर केलें. ऑगस्ट महिन्याची शान अधिकच वाढली. आणि त्यामुळें ऑगस्ट महिन्याला स्वातंत्र्यमास असें नवें नांव बहाल करायला कोणतीच हरकत नसावी.

या स्वातंत्र्य मासांतील एक अपरिहार्य व्रत म्हणजे क्रांतिकारक हुतात्म्यांचें श्रद्धापूर्वक संस्मरण.

दीपावलीनें या अंकांत इतरत्र या व्रताची सांगता केली आहे.

## सरकारी नोकरांचा संप

जुलै महिन्यांतील नवलपूर्ण घटना म्हणजे २२ लाख सरकारी नोकरांचा राष्ट्रव्यापी संप. ११ जुलैच्या मध्यरात्रीं सुरू झालेल्या या संपानें सरकारच्या नाड्या आंखडतील अशी सर्वसामान्य जनतेची समजूत. पण अखेर ती समजूत सरकारनें खोटी पाडली. राष्ट्रपतींच्या वटहुकुमामुळें सरकारी नोकरांचें मनोधैर्य खचलें, आणि संप सुरू होतांच पुढारी तुरुंगांत जाऊन बसल्यामुळें नेतृत्वाच्या अभावामुळें संप अक्षरशः बारगळला. या संपाचें नेतृत्व बव्हंशीं प्रजासमाजवादी पुढाऱ्यांकडे होतें आणि तें नेतृत्व तितकेंसें प्रखर आणि राष्ट्रव्यापी नसल्यामुळें दळणवळण आणि वाहतुकीच्या नेहमींच्या व्यवस्थेवर कोणताच परिणाम न होतां संपाचें स्वरूप व्हावें तितकें परिणामकारक झालें नाहीं.

या असफल संपापासून सरकारनें आणि नोकरांनीं किंवा नोकर संघटनांनीं योग्य तो बोध घेतला पाहिजे. सरकारचा बोध असा कीं राज्ययंत्रांतील प्रमुख घटक अशाप्रकारें सदैव असंतुष्ट राहिला तर तें राज्ययंत्र कोणत्याक्षणीं कोसळेल याचा नेम नाहीं. शिवाय वेतनचौकशी मंडळाचा अहवाल आणि त्याची अंमलबजावणी याबाबत सरकार अक्षम्य अशा ढिलेपणानें वागलें. आणि त्यामुळें या चार दिवसाच्या असफल संपानें मुद्दां भारतांतील सरकारी यंत्रणेंतील आणि पर्यायानें सामान्य जनतेंतील असंतोष जगाच्या वेशीवर टांगला गेला. इतर राष्ट्रांच्या अंतर्गत असंतोषाबाबत समझोता करण्याची त्रयस्थाची भूमिका पत्करणाऱ्या पं. नेहरूंच्या व्यक्तिमत्वावर हा एकप्रकारचा शितोडाच. आणि त्यामुळें सुरवातीपासून पं. नेहरूंनीं या बाबतींत एक प्रकारचें खंबीर धोरण स्वीकारलें आणि सरकारनें कसेंहि करून या संपाची गठडी वळविण्याचा मनसुबा रचला आणि अखेर सरकारी नोकर सरकारला बिनशर्त शरण गेले. या प्रकरणीं सरकारी नोकरांनीं आणि त्यांच्या नेत्यांनी थोडी घिसाडघाई आणि नंतर ढिलाई दाखविली. सद्यपरिस्थितींत त्यांना मनापासून संप नको होता—आणि सरकार संपाची पाळी आणूं देणार नाहीं असा त्यांनी सोयीस्कर समज करून घेतला आणि अखेर तोच अंगावर आला. शिवाय असा संप चालविण्यासाठीं पैसा आणि सामर्थ्यवान अशी एक संपयंत्रणा लागते. तिचा सर्वस्वी अभाव. कदाचित् कम्युनिस्ट नेते संपापासून दूर राहिल्याचा हा परिणाम असावा.

तथापि सरकारनें आपल्या विजयापासून हुरळून न जातां आणि कोणत्याहि प्रकारें सूडाचें धोरण न अवलंबिता सरकारी नोकरांच्या मागण्यांचा योग्य तो विचार केला पाहिजे आणि पुढची पावलें टाकलीं पाहिजेत. कारण तिसऱ्या योजनेची आपण आतां आंखणी करीत असतांना त्या योजनेचा बराचसा भार ज्यांच्याहि सहकार्यावर आहे अशा सरकारी नोकरांना असंतुष्ट ठेवून चालणार नाहीं !

— **पिनाकि**

पान २४ वरील 'वचनपूर्ति' ही लोककथा श्री. **गोपाळकृष्ण भोबे** यांनी लिहिली.

हें मासिक श्री. दीनानाथ दलाल यांनीं न्यू भारत प्रिंटिंग प्रेस, ६, केळेवाडी, गिरगांव, मुंबई ४ येथें छापून दलाल आर्ट स्टुडिओ, ४०/४२ केनेडी ब्रिज येथें प्रकाशित केलें.

